

नोंदणी क्रं. एफ.१६०१४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

फेब्रुवारी २००७

## गीता प्रवचने
## विनु - अमृतमंथन

वेद वेदांतगीतानां विनुना सार उद्धृतः ।
ब्रह्म सत्यं, जगत्स्फूर्तिः जीवनं सत्यशोधनम् ।।



विकासाची
विविध
प्रतिमाने

'उत्तर-नव'
भारत
सु
सं
वा
दा
सा
ठी







अनुक्रमणिका

## नाम-माला

ॐ तत् सत् श्री नारायण तू पुरुषोत्तम गुरु तू।
सिद्ध बुद्ध तू स्कंद विनायक सविता पावक तू।
ब्रह्म मज्द तू यह्व शक्ति तू ईशु-पिता प्रभु तू।
रुद्र विष्णु तू राम-कृष्ण तू रहीम ताओ तू।।
वासुदेव गो-विश्वरूप तू चिदानंद हरि तू।
अद्वितीय तू अकाल निर्भय आत्मलिंग शिव तू।।



## अमृत - रहस्य

बाबाचे मत आहे की गीता अनेक प्रकारचे समन्वय करते.

- एक म्हणजे तत्त्व-ज्ञानांचा समन्वय,
  ज्याच्या शिवाय जीवनाचा पायाच निर्माण होत नाही.
- दुसरा समन्वय व्यक्ती आणि समाज यांचा.
  त्याशिवाय ना मनुष्याची काही प्रगती होऊ शकत, ना समाजाची.
- तिसरा समन्वय म्हणजे
  मनुष्याच्या अंतर्गत देह आणि आत्मा यात जे द्वंद्व आहे, ते मिटविणे.

तिन्ही प्रकारच्या समन्वयांना गीतेत प्राधान्य आहे,
आणि तिन्हींची अत्यंत आवश्यकता आहे.
तिन्ही समन्वयांतूनच जीवनात समाधान मिळू शकते,
अन्यथा नव्हे.



अलौकिक ते लौकिक अर्थ विलयाला गेले
समाधिस्थ ते लौकिक अर्थे समाधिस्थ झाले
मुक्त जीवाला मुक्ति लाभली लौकिक अर्थाने
पूर्णत्वाला मिठी मारली या पूर्णत्वाने
स्वयंप्रकाशी ज्योतीला का पणतीची महती
ज्ञानज्योतिला या देहाची गणती ना प्रीती
लौकिक अर्थे एक पुण्यतिथि जन्माला आली
लौकिक अर्थे - ! तरी आंसवे नयनी का झरली

- नरसिंह दाभोलकर

पूर्वप्रकाशन : साधना (विनोबा स्मृति अंक)



(मुखपृष्ठ : 'मैत्री' ब्रह्मविद्या मंदिर, पवनार यांच्या सौजन्याने.)



अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६० । अंक ५ । फेब्रुवारी २००७
माघ शके १९२८
वार्षिक वर्गणी २०० रुपये.
या अंकाची किंमत रु. २०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोनानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्य-निष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

---

* नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै० शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

---

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

---



अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका



**नवलेखक स्वागत :**

**वसंत नारगोलकर :**
विनोबांचे निष्ठावंत परंतु साक्षेपी अभ्यासक आणि अनुयायी.

**भाऊ धर्माधिकारी :**
गांधीजी विनोबा विचारांचे सहृदय समीक्षक.

बालविजय, गौतम (बजाज), भाऊ पानसे, डॉ० गीता मेहता हे सर्वजण विनोबा, पवनार आश्रम, ब्रह्मविद्या मंदिर परिवारातील मान्यवर मंडळी आहेत. शिवाजी न० भावे यांच्या अधिकाराविषयी अन्य कोणीच काही सांगण्याचे कारण नाही.

**नरसिंह दाभोलकर :**
निवृत्त डीन, मेडिकल फॅकल्टी, मुंबई.

सर्व लेखक संपर्क :
द्वारा प्रा० देवदत्त दाभोलकर

# अतिथी संपादकीय
## देवदत्त दाभोलकर

मला अनुभवास आलेल्या समस्या व मला सुचलेली/सुचणारी उत्तरे या स्वरूपाची टिपणे महिलांनी पाठविल्यास चर्चासत्रासाठी त्यांचे स्वागत आहे.

'नवभारत'चा पुढील अंक महिला विशेषांक जोड अंक असेल. त्यातील विषय चर्चेसाठी असतील.

**चर्चासत्र**

**२५, २६ मे २००७, सातारा.**

**विषय :**

मानवतेचा उपेक्षित शोषित उत्तमार्ध :
स्त्री : काही समस्या काही उत्तरे

**संयोजक :**

डॉ० शैला दाभोलकर
'परिवर्तन', सहयोग हॉस्पिटल ॲनेक्स
सदरबझार, सातारा ४१५००१
दूरध्वनी : (निवास) २३९४३९
(परिवर्तन) २२७३०७

विनोबांच्या गीताप्रवचनांचे अमृत वर्ष फेब्रुवारी २००७ मध्ये पूर्ण होत आहे. त्या निमित्ताने या अंकाची रचना करण्यात आली आहे.

या रचनेचा एक विशेष भाग 'हरवलेली मुक्ता : शांता' हा आहे. त्या व्यक्तिमत्त्वाने मला अनेक वर्षे अस्वस्थ ठेवले आहे. आपल्या वयाची शंभरी पूर्ण केल्यानंतर महादेवीताईंचे २००६ मध्ये निधन झाले. त्यांच्या विषयीचे लेख 'मैत्री' च्या अंकात वाचले आणि ही अस्वस्थता थोडी कमी झाली. शांताचे निधन झाल्यानंतर लवकरच महादेवीताईंचा विनोबांशी संपर्क झाला आणि अर्धशतकाचा काळ त्यांनी बाबांची धाकट्या बहिणीच्या मायेने साथ केली. विनोबांना याचे स्नेहार्द्र भान होते असे माझे मन मला ग्वाही देते.

हा प्रयत्न अनाठायी आहे असे अनेकांना वाटण्याची शक्यता आहे. अनेकांना हे सर्व रुचणारही नाही.

'मानवतेचा उत्तमार्ध : स्त्री : काही समस्या काही उत्तरे' यावर 'नवभारत'चा यापुढील अंक केंद्रित असेल. शांताची करुण कहाणी या संदर्भात एक महत्त्वाचे दर्शन आहे. हा परिपाक समाजव्यवस्थेचा, कुटुंब-व्यवस्थेचा की एका कुटुंबाच्या कमकुवतपणाचा? अशा कुटुंबात जर ही स्थिती असेल तर समाजाच्या अन्य स्तरात काय असेल?

ही शोषित पददलित अवस्था वरिष्ठवर्णातील महिलांची आहे तशीच निकृष्टतम जातीतील कुटुंबांतील स्त्रियांचीही आहे. म्हणून तर गांधीजींना आपल्या स्वप्नातल्या स्वतंत्र भारताचे चित्र रेखाटताना निर्देश करावा लागला : 'माझ्या स्वप्नातल्या या भारतात निकृष्टतम जातीतील महिला भारतात सर्वोच्च स्थानावर विराजमान झालेली दिसेल अशी आशा मी बाळगून आहे.'



अनुक्रमणिका

# चर्चासत्रांविषयी

## 'उत्तर-नव' भारत
## विकासाची विविध प्रतिमाने

संयोजक : नवभारत मासिक, प्राज्ञपाठशाळा, वाई
अलदा निकेतन, सातारा (अलदा : अच्युत लक्ष्मण दाभोलकर, १८९३-१९५५)
(या खेरीज अन्य कोणा व्यक्तीचे, संघटनेचे उत्स्फूर्त सहकार्य आल्यास त्याचाही साभार स्वीकार करण्यात येईल.)

चर्चासत्रांविषयीची निवेदने व सूचना या आधीच्या अंकातून आलेल्या आहेत. यापुढील संदर्भात :

१. आतापर्यंतची सर्व चर्चासत्रे आयोजिल्याप्रमाणे पूर्ण झाली आहेत. त्यात सादर झालेले निबंध हवे असल्यास सचिव, प्राज्ञपाठशाळा यांना लिहावे. Xerox व कुरिअर खर्च घेऊन ती पाठविण्यात येतील.

२. यानंतरची चर्चासत्रे पूर्वी प्रकट केल्याप्रमाणे होतील.

३. 'नवभारत'चा यापुढील अंक 'स्त्री प्रश्न : काही समस्या काही उत्तरे' यावर असेल. त्याच्या आधारे व येतील त्या नव्या टिपणांच्या आधारे या विषयावर सातारा येथे २५ मे (दुपारी २.०० ते ६.००) व २६ मे (सकाळी ९.०० ते १.००) या वेळात चर्चासत्र होईल. सूत्रसंचालन प्रा० देवदत्त दाभोलकर करतील. 'संयोजक' म्हणून सौ० शैला दाभोलकर, 'परिवर्तन', सातारा यांनी साहाय्य करण्याचे मान्य केले आहे याचा आनंद होतो.

४. 'लोकशाही समाजवाद' या विषयावरील चर्चासत्र वाई येथे दि. २७, २८ मे २००७ रोजी होईल.

५. सप्टेंबर २००७ च्या पहिल्या आठवड्यात सहभागी होऊ इच्छिणाऱ्यांच्या सर्वसाधारण सोयीच्या दिवशी जे. पी. नाईक जन्मशताब्दीच्या निमित्ताने 'उत्तर-नवभारतात भारतीय जनतेचे शिक्षण : नवे संदर्भ, समस्या व उत्तरे' या विषयावर सातारा, वाई वा पुणे येथे दोन दिवसांचे चर्चासत्र होईल. या चर्चासत्रासाठी प्रा. देवदत्त दाभोलकर यांच्याशी संपर्क साधावा.

कोणत्याही चर्चासत्रात सहभागी होऊ इच्छिणाऱ्यांनी आधी शंभर रुपयांची मनिऑर्डर सचिव, प्राज्ञपाठपाळा मंडळ यांच्याकडे केल्यास त्यांना चर्चासत्राविषयी टिपणे पाठविली जातील.

संपर्कासाठी पत्ते -

**प्रा. देवदत्त दाभोलकर**
**निवास :** शांतिनिकेतन
४३, गुरुकृपा हौ. सो.
शाहूनगर, सातारा ४१५००१
दूरध्वनी : (०२१६२) २२०३७८
E-mail : ndabholkar@rediffmail.com

**प्रा. यशवंत कळमकर**
**निवास :** २४१०-क, सोनगीरवाडी,
दूरध्वनी कॉलनी रस्ता, वाई ४१२८०३
दूरध्वनी : (०२१६७) २२२७०४
**कार्यालय :** सचिव, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई
दूरध्वनी : (०२१६७) २२०००६

अनुक्रमणिका






# एक स्थितप्रज्ञ दर्शन : विनोबांचे जीवन-मरण

## देवदत्त दाभोलकर

'गीताई माझ्या हातून (भगवंताने) करून घेतलेली सर्वोत्तम सेवा आहे. माझे जीवन तसे असावे असा सर्वांनी मला आशीर्वाद द्यावा.' - विनोबा

'स्थितप्रज्ञ' हा भगवद्गीतेचा खास शब्द आहे. विनोबा सांगतात : 'स्थितप्रज्ञ हा गीतेचा आदर्श पुरुषविशेष आहे. तो शब्दही गीतेचा खास शब्द आहे. गीतेच्या ग्रंथात तो सापडत नाही. गीतेच्या पूर्वीच्या नंतरच्या ग्रंथांत तो भरपूर सापडतो.' (पृ० १, स्थितप्रज्ञ दर्शन, आवृत्ती पहिली, एप्रिल १९४६)

त्या प्रकाशनातील विनोबांचे 'निवेदन'ही महत्त्वाचे आहे. विनोबांनी लिहिले आहे :

'स्थितप्रज्ञाच्या लक्षणांत एक समग्र दर्शनच भरलेले आहे. ते उलगडून दाखवण्याचा ह्यात प्रयत्न आहे. त्यातील काही भाग पहिल्या वाचनाने कदाचित मनावर ठसणार नाही असा संभव आहे. पण अनेक वेळा वाचून चिंतन करीत गेल्यास आणि जेवढे समजले तेवढ्याचा प्रयोग करीत गेल्यास, हळूहळू अनुभवाने सर्व उकलेल.'

'तीस वर्षांच्या निदिध्यासातून जो अर्थ स्थिर झाला तो येथे विवरला आहे. यात कमी जास्ती काही असणारच. सारे ईश्वराला समर्पून त्यातून मोकळे होणे, एवढाच त्यावर उपाय. माझ्या मनाने त्यासाठीच हे प्रकाशन आहे.'

निवेदनावर १२.०४.४६ अशी तारीख आहे. म्हणजे विनोबांचा हा निदिध्यास त्यांच्या अगदी तरुण वयात सुरू झाला. हा अशाच निदिध्यास त्यानंतरच्या त्यांच्या सुमारे चार दशकांच्या कालावधीत अखंड चालू राहिला. ध्यासात स्मरण, मनन, चिंतन हे सर्व येतेच परंतु प्रयोगशील जागृत आचरणही येते. महासमाधीच्या शेवटच्या क्षणापर्यंत हा त्यांचा निदिध्यास चालूच होता असणार याविषयी कोणाच्या मनात शंका येऊ नये अशीच त्यांची जीवनसाधना होती.

यातील काही घटनांचा मी साक्षी आहे. काही घटनांना सर्व जग साक्षी आहे.

परंतु तिकडे वळण्यापूर्वी विनोबांच्या स्थितप्रज्ञ-दर्शनाचे एक महत्त्वाचे अंग समजावून घेतले पाहिजे व निदान स्वतःशी तरी मान्य केले पाहिजे. कारण, तरच दुसऱ्याच्या जीवनातील स्थितप्रज्ञतेच्या आविष्काराचे मूल्यमापन आपल्याला करता येणे शक्य आहे. त्यानंतर असे मूल्यमापन करण्याचा आपल्याला अधिकारच नाही हे आपोआप लक्षात येते. मग उरते ते सुजाण दर्शन व त्या दर्शनातून आपल्या स्वतःच्या जीवनातील वाटचालीच्या संदर्भात आपल्याला मिळू शकणाऱ्या मार्गदर्शनाचा शोध.

विनोबा लिहितात ('दर्शन' पृ० ७) :

'एखाद्या अल्पबुद्धीच्या आणि अशिक्षित माणसाला राष्ट्राचा कारभार चालविण्याचे नेतृत्त्व साधणे संभवनीय नाही. पण अगदी अल्पबुद्धीच्या आणि अशिक्षित माणसालाही या जन्मात स्थितप्रज्ञ होण्याची शक्यता निःसंशय आहे. त्याला भाराभार बुद्धीची गरज नाही. प्रज्ञेची एक ठिणगी पुरे. सारी बुद्धी जगाचा कारभार आणि उलाढाल वाटेल तेवढी करो, पण त्रिभुवनाला खाक करण्याचे सामर्थ्य मात्र प्रज्ञेच्या ठिणगीचे आहे.'

हे आकलन आणि आश्वासन ही विनोबांची विशेषता आहे. हे अवधान त्यांचे स्थितप्रज्ञदर्शन घेताना आपण आपल्या मनात सतत जागृत ठेवले पाहिजे तरच ते खरे 'दर्शन' होऊ शकेल.

### कोणार्कच्या वाटेवर एका सायंकाळी

१९५५ मध्ये मी जगन्नाथपुरी येथील अखिल भारतीय सर्वोदय संमेलनाला गेलो होतो. त्यानंतर कोणार्कच्या पडावापर्यंत चार दिवस मी पदयात्रेत सहभागी होतो. एके दिवशी विनोबा मोकळ्यावर झाडाखाली बसले होतो. तीन-चार दक्षिणेकडून आलेली मंडळी होती. मीही केवळ दर्शनासाठी म्हणून तेथे बसलो होतो. एकाने विनोबांना प्रश्न विचारला, 'स्थितप्रज्ञ कसा ओळखावा?' विनोबा सहज स्फूर्तीने म्हणाले, 'तमाचा लगाकर देखो। अगर घुस्सा आया तो






स्थितप्रज्ञ नहीं है।' ते त्यांचे उद्गार जसेच्या तसे आजवर माझ्या लक्षात राहिले आहेत.

जगन्नाथपुरी येथील तीनचार दिवसांच्या वास्तव्यात स्थितप्रज्ञतेच्या विविध अंगांचे अनेक पैलू मला पहावयास अनुभवावयास मिळाले. आपल्या प्रमुख भाषणात गांधीजींचा अर्थातच त्यांनी निर्देश केला. अगदी नम्रतेने व आत्यंतिक जिव्हाळ्याने ते म्हणाले, 'मैं गांधीजी ने पाला हुवा एक जंगली जानवर था - अगर बापू होते तो मैं आज बाहर निकल न पडता।' हे उद्गारही माझ्या अंतःकरणात कायमचे कोरले गेले आहेत. हे बोलताना विनोबांचा कंठ दाटून आला आणि त्यांच्या नयनातून घळाघळा अश्रू वाहू लागले.

अशी भावविवशता स्थितप्रज्ञतेला अपेक्षित आहे की नाही? गीतेने याचे स्पष्ट विवरण कोठे केलेले नाही किंवा स्थितप्रज्ञदर्शन संदर्भात विनोबांनीही याविषयीची तात्त्विक मांडणी केलेली मला कुठे आढळली नाही.

गांधीजींच्या हत्येनंतर विनोबांनी अश्रू ढाळले होते. लोकांनी एकमेकांना ऐकून विचारले, 'काय! विनोबाजी रडले?' विनोबाजींच्या हे कानावर आले तेव्हा ते म्हणाले, 'होय. त्यांना सांगा. विनोबा रडला. परमेश्वराने विनोबाला हृदय दिले आहे यासाठी तो त्याचा ऋणी आहे.' मानवतेचा स्पर्श असलेली ही स्थितप्रज्ञता आहे.

संमेलनात मध्यप्रदेशातील एका तरुण कार्यकर्त्याचा परिचय झाला. (नाव आता विसरलो.) कृतिशील, उत्साही परंतु परखड भडक माथ्याचा. एके दिवशी सायंकाळी भोजनगृहात तणतणत आला. मोठ्याने ओरडत : 'सर्वोदयी भ्रमाचा भोपळा फुटला. आता परत विनोबांना भेटावयास जाणार नाही.' झाले होते असे की त्याला दिलेली भेटीची वेळ कोणी मंत्री विनोबांना भेटावयास येणार असल्यामुळे बदलण्यात आली होती.

दुसरे दिवशी विनोबांनी त्याला बोलावून घेतले. भेटीनंतर त्याची गाठ पडली तेव्हा निवळलेला दिसला, म्हणाला, 'मी विनोबांना माझ्या सर्व तक्रारी परखडपणे सांगितल्या. केंद्रातले कार्यकर्ते दर पंधरा दिवसांनी बाबांकडे जाऊन स्फूर्ती घेवून येतो म्हणून सांगतात आणि सटकतात आदि. विनोबा मला म्हणाले, 'अरे हे असे चालावयाचेच. लोक सिनेमा बघायला नाही का जात? तसे हे विनोबाला बघायला येतात.'

मला स्वतःलाही एक गोष्ट खटकली होती. भूदान कार्यक्रमाविषयीच्या माझ्या काही शंका होत्या. माझी भेटीची वेळ ठरली होती व त्याप्रमाणे ती चर्चा झालीही (पुढे ती 'नवभारत' मासिकात प्रसिद्धही झाली) परंतु प्रारंभी एका परदेशी नियतकालिकाचा छायाचित्रकार आला होता व महादेवीताईंना बोलावून थोडासा कृत्रिम पद्धतीचा फोटो घेण्यात आला हे माझ्या मनाला रुचले नाही. त्यानंतर माझ्या पुलाखालून आता पन्नास वर्षांचे पाणी वाहून गेले आहे. या दोन्ही घटना या पद्धतीने विपर्यस्त करण्यात माझी अपरिपक्वताच कारण होती असेच आज मला वाटते.

पुरीचे आणखी दोन प्रसंग मला या दृष्टीने लक्षणीय वाटतात.

सर्वोदयाच्या सर्वोच्च कार्यकर्त्यांची बैठक होती. सुमारे पंचवीस तीस कार्यकर्ते होते. विनोबाजी, जयप्रकाश नारायण, दामोदरदास मुंदडा आदि स्तराचे ते होते. भूदानाचा शास्त्रीय अभ्यास करू पाहणारे इतर दोघेजणही होते.

बैठकीत प्रत्येक कार्यकर्ता आपापल्या कार्याचा अहवाल सांगत होता. दामोदरदासजींनी आपला अहवाल सांगितला. विनोबा म्हणाले, 'दामोदरने अभी जो कुछ कहा इस के बारे मे मेरी इम्तिहान ली जाय तो मैं तीस फीसदी भी गुण हासिल नही कर सकूंगा।' विनोबांचा आग्रह कार्यकर्त्यांनी इतर सर्व कामे बाजूला ठेवून केवळ भूदानावर आपले लक्ष केंद्रित केले पाहिजे, अशा स्वरूपाचा होता. चर्चा थोडी तापली आणि विनोबा रागाने बैठकीतून निघून गेले. सारी बैठक अवाक् झाली. जयप्रकाशजी विनोबांच्या समोर जवळ बसले होते. थोड्या वेळानंतर भानावर आल्यासारखे ते स्वतःशीच थोडे मोठ्याने उदास आवाजात म्हणाले, 'बाबा तो मंत्र जानते है। तंत्र हम लोगोंको करना पडता है।'

स्थितप्रज्ञाला अश्रू जसे साजून दिसू शकतात तसेच रागाचेही आहे असे मला सुचवावयाचे नाही. त्या दिवसाच्या उत्तरार्धाविषयी मला सांगावयाचे आहे. विदर्भाकडचे दोघे कार्यकर्ते आलेले होते. ते संध्याकाळी विनोबांना भेटून आल्यावर सांगत होते, 'आम्ही आमचा जिल्हा भूदानासाठी दोनदा पिंजून काढला असे विनोबांना सांगितले. तर विनोबा म्हणाले, 'असे करू नका. केवळ भूदान भूदान करू नका. तसे केलेत तर तुम्ही दिसल्यावर भूत आले असे समजून लोक पळून जातील. लोकांची विधायक कामेही करत जा. तुकारामाचे

अनुक्रमणिका

उदाहरण डोळ्यासमोर ठेवा. तो पंढरीला निघाला म्हणजे इतरांना विचारीत असे, 'मी तुमच्यासाठी पंढरीहून काय आणू?' ते कार्यकर्ते पुढे म्हणाले, 'तुकारामाचे नाव घेतले आणि विनोबांचे डोळे अश्रूंनी डबडबून आले.'

सकाळच्या बैठकीत मी विनोबांची उलट टोकाची भूमिका बघितली होती. ही भिन्नता 'अधिकार तैसा करू उपदेश' या भूमिकेतून आली असावी असे मी मानले. (सकाळच्या दर्शनाने मी चकित झालो होतो. त्यानंतर अनेक दशकांनी दामोदरदासजींची त्यांच्या निधनाच्या आधी तीनचार वर्षांत एकदा भेट झाली होती. मी 'माझी आठवण बरोबर आहे ना' असे विचारले. त्यांच्याही ती चांगली स्मरणात होती. ते 'हो' म्हणाले होते.)

विनोबांच्या स्थितप्रज्ञतेचा आणखी एक कसोटीचा प्रसंग मी अनुभवला. विनोबांची पदयात्रा कर्नाटकातून येऊन महाराष्ट्रात तिचा आरंभ झाला होता. कोल्हापूरहून निघाल्यावर जयसिंगपूरला साहित्यिकांशी त्यांची चर्चा झाली. तिला मी उपस्थित होतो. त्यांच्या साहित्य विषयक भूमिकेचे चांगले विवरण त्यांनी केले.

दुसऱ्या दिवशी ती पदयात्रा सांगलीत आली. दुपारी तीन वाजता विचारवंतांशी त्यांची बैठक झाली. तिलाही मी उपस्थित होतो. मी त्यांना संततितिनियमन विषयक भूमिकेविषयी एक प्रश्न विचारला. विनोबा म्हणाले, 'लोक मी काय लिहिले ते वाचत नाहीत आणि प्रश्न विचारतात.' मी म्हटले, 'आपण लिहिलेले सर्व मी वाचलेले आहे, हे मी आपल्याला नम्रपणे सांगू इच्छितो. (त्यावेळी ते खरेही होते.) परंतु आपल्या आणि अण्णासाहेब सहस्रबुद्धे यांच्या भूमिकांत मला फरक आढळतो. म्हणून मला हा प्रश्न परत विचारावासा वाटतो.' यानंतर इतर दोघातिघांशीही काही कडवट उत्तरे झाली. शेवटी विनोबा म्हणाले, 'ज्यांना माझे म्हणणे ऐकावयाचे नसेल त्यांनी येथून निघून जावे.' अर्थात कोणीच बाहेर गेले नाही.

बैठक संपल्यावर अनेकांच्या तीव्र प्रतिक्रिया आल्या. आपण याबाबत निदर्शन केले पाहिजे, असे काहीजण म्हणू लागले. पत्रकार सनसनाटीला तयारच होते. मी त्या सर्वांना म्हणालो, 'अरे साधा कलेक्टर काही बोलला तर तुम्ही मुकाटपणे ऐकून घेता आणि विनोबांविषयी अशी भूमिका घेता.'

माझे म्हणणे मान्य झाले आणि प्रकरण पुढे वाढवावयाचे नाही असे ठरले.

भाऊसाहेब रानडे पदयात्रेचे व्यवस्थापक होते. ते राष्ट्रसेवादलाचे. त्यांच्या मार्फत विनोबांनी राष्ट्रसेवादलातील सांगलीचे इंग्रजीचे प्राध्यापक अ० के० भागवत यांना पहाटे चार वाजता भेटीस बोलावले. त्यांना विनोबा म्हणाले, 'काल माझी मनःस्थिती ठीक नव्हती. माझे निकटचे सहकारी (माझ्या आठवणीप्रमाणे बाबा राघवदास) गेले. ती छायाही माझ्या मनावर होती. याचा अर्थ मी अजून स्थितप्रज्ञ झालो नाही असाच आहे. आज सायंकाळच्या सभेत मी तुम्हा सगळ्यांची क्षमा मागणार आहे.'

अर्थात असा आग्रह त्यांनी धरू नये अशीच विनंती त्यांना केली गेली व त्यांनी मानली.

ही घटना या ठिकाणी एवढ्याचसाठी सांगितली की स्थितप्रज्ञतेच्या वाटचालीतील खाच खळगे काटे कुटे हे विनोबा स्वत: अनुभवत होते व उचित प्रतिसादाने ते पारही करीत होते याची एक झलक मिळाली.



विनोबांनी कोणार्कला स्थितप्रज्ञाची जी कसोटी सांगितली होती ती त्यांची कसोटी संपूर्ण राष्ट्राने आणीबाणीच्या कालखंडात घेतली व त्या कसोटीला ते संपूर्णपणे उतरले अशी माझी धारणा आहे. विनोबांची भूमिका योग्य की अयोग्य हा या संदर्भात दुय्यम महत्त्वाचा प्रश्न आहे; तो बुद्धीच्या स्तरावरचा आहे आणि त्याची वेगवेगळी उत्तरे संभवू शकतात. परंतु त्यांच्या भूमिकेचा जो विपर्यास केला गेला व त्यांच्यावर जी विखारी टीका करण्यात आली ती त्यांनी कोणाविषयीही कटु भावना मनात न आणता, शांतपणे सहन केली व आपल्याला योग्य वाटली त्याच भूमिकेचा पुरस्कार केला हे स्थितप्रज्ञतेच्या कसोटीच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे.

आणीबाणी जाहीर होण्याच्या आधीच सहा महिने विनोबांचे वर्षभराचे मौन सुरू झाले होते, 'अनुशासन पर्व' या त्यांच्या दोन शब्दांच्या लिखित प्रतिक्रियेचा विपर्यास करण्यात आला. त्याच वेळी त्यांनी त्याचा लिखित प्रतिवाद केला असता तर ते अधिक उपयुक्त झाले असते असे मला अजूनही वाटते.

मौन संपल्यावर विनोबांनी आपल्या मनातील 'अनुशासना'चा आशय स्पष्ट केला. तो असा होता :

'अनुशासन पर्व या शब्दाचा माझा अर्थ थोडक्यात








सांगतो. अनुशासन पर्व शब्द महाभारतात आलेला आहे. त्यापूर्वी तो उपनिषदांत आलेला आहे. प्राचीन काळचा रिवाज होता. विद्यार्थी बारा वर्षे आचार्यांजवळ राहून विद्याभ्यास करायचा. विद्याभ्यास पुरा करुन तो घरी जायला निघायचा तेव्हा त्याला आचार्य अंतिम आदेश द्यायचे. त्याचा उल्लेख उपनिषदात आलेला आहे. 'एतत् अनुशासनम्। एवं उपासितव्यम्।' हे अनुशासन आहे. याची उपासना तुम्ही करावी. आचार्यांचे असते अनुशासन आणि सत्ताधीशांचे असते शासन. जर 'शासना'च्या मार्गदर्शनाखाली जग राहिले तर जगात कधीच समाधान राहणार नाही. 'शासना'च्या मार्गदर्शनाने काय होईल? समस्या सुटेल. परंतु सुटलेली समस्या पुन्हा उमटेल. हा तमाशा आज जगभर चाललेला आहे. 'ए' पासून 'झेड्' पर्यंत, अफगाणिस्थानापासून झांबियापर्यंत तीनशे साडेतीनशे शासने जगात असतील. पुन्हा त्यांची गटबाजी चालते. सर्वत्र असंतोष, मारामाऱ्या. 'शासना'च्या आदेशानुसार चालणाऱ्यांची ही स्थिती आहे. त्याऐवजी जर आचार्यांच्या अनुशासनाखाली जग चालेल तर जगात शांती राहील. आचार्यांचे वर्णन बाबाने गुरु नानकांच्या भाषेत केले आणि त्यात आपला एक शब्द जोडला - निष्पक्ष. निर्भय, निर्वैर! जे कधी अशांत होत नाहीत. ज्यांच्या मनात क्षोभ कधीच नसतो. प्रत्येक विषयात शांतीने विचार करतात आणि जेवढे सर्वसंमत विचाराने ठरते ते लोकांसमोर ठेवतात. त्या मार्गदर्शनाखाली जर लोक चालतील तर लोकांचे हित होईल आणि जगात शांती राहील. हा 'अनुशासना'चा माझा अर्थ आहे.'

विनोबांच्या या मांडणीच्या खाली दिनांकाचाही निर्देश आहे. २५ डिसेंबर १९७५. विनोबांचे मौन सुटले होते.

या कालावधीत विनोबांच्या स्थितप्रज्ञतेचे जवळून दर्शन घेण्याचीही मला संधी मिळाली. आणीबाणीच्या परिस्थितीचा विचार करण्यासाठी अशा आचार्यांचे तीन दिवसांचे एक संमेलन पवनारला घेण्यात आले. भारतातील सुमारे तीस आचार्यांना आमंत्रण होते. सुदैवाने माझा त्यात समावेश होता. (सुदैवाने असे एवढ्याच साठी म्हटले की माझी पत्नी आणीबाणीच्या कट्टर विरोधात होती व मुलगा तर त्यासाठी तुरुंगात गेला होता. या आमंत्रणामुळे माझ्या कुटुंबातील माझी काळवंडलेली प्रतिमा थोडी उजळली.) मी निष्पक्ष, निर्वैर वृत्तीचा होतो ही गोष्ट खरी, परंतु निर्भयतेचा दावा मी करु कणार नाही. कारण निर्भय असतो तर आणीबाणी विषयीचे माझे मत प्रकट करण्यासाठी विनोबांच्या कृपाछत्राची गरज मला भासली नसती. असो.

विनोबांनी उद्घाटनाचे भाषण केले व शेवटच्या दिवशी समारोपाचे. त्याखेरीज ते संमेलनात उपस्थितही राहिले नाहीत. आपल्या दोन्ही भाषणांत देखील त्यांनी केवळ शैक्षणिक समस्यांचे विवेचन केले. बाहेरुनही कोणत्याही सूचना केल्या नाहीत. चर्चेनंतर शेवटी सर्वसंमत निवेदन तयार झाले. ते दोन कारणांनी माझ्या विशेष लक्षात राहिले आहे. एक तर निवेदन जयप्रकाश नारायण यांना मुंबईत भेटून ते त्यांच्याकडे प्रत्यक्ष देण्याची संधी मला मिळाली. माझ्याबरोबर डॉ० पी० आर० ब्रह्मानंदही होते. ते मुंबई विद्यापीठात अर्थशास्त्राचे नामवंत प्राध्यापक होते व आचार्य संमेलनात आमंत्रित सहभागी होते.

दुसरे कारण थोडे वेगळ्या स्वरुपाचे आहे. निवेदनाचा मसुदा करताना अर्थातच नागरिकांच्या मूलभूत हक्कांचा निर्देश केला गेला. त्यावेळी मी म्हटले, 'आपण मूलभूत हक्काबरोबर नागरिकांच्या मूलभूत कर्तव्यांचाही निर्देश केला पाहिजे.' माझी सूचना सर्वमान्य झाली आणि Fundamental Duties चा ही निर्देश केला गेला. या निवेदनाला इंदिरा गांधींनी कोणताच प्रतिसाद दिला नाही. परंतु काही महिन्यांतच भारताच्या राज्यघटनेत बदल करुन Fundamental Duties चा समावेश केला गेला.

**२३ सप्टेंबर १९८२**

हा दिवस अनेक कारणांनी माझ्या स्मरणात राहिला आहे आणि निरंतर राहील. सेवाग्रामला एक चर्चासत्र होते आणि त्यासाठी मी तेथे गेलो होतो. सकाळी बालविजय यांची गाठ पडली. ते म्हणाले, 'पवनारला येणार का?' मी सांगितले, 'नाही. महापुरुषांचा अकारण वेळ घेणे माझ्या मनाला रुचत नाही. परंतु माझ्या मनात विनोबांना एक प्रश्न विचारावयाचा आहे. तो तुमच्याकडे देतो. त्यांना दाखवा.' ते 'हो' म्हणाले आणि मी माझा प्रश्न लिहून त्यांच्याकडे दिला.

दुपारी तीनच्या सुमारास गोविंदपूर वनवासी सेवाश्रमचे प्रेमभाई व रागिणीताई पवनारला जाण्यासाठी बाहेर पडत होते. प्रेमभाईंनी विचारले, 'येणार का?' माझा बालविजय बरोबरचा संवाद त्यांना सांगितला. प्रेमभाई

म्हणाले, 'माझे मतही तुमच्यासारखेच आहे. परंतु रागिणीचा आग्रह.' रागिणीताई प्रेमभाईंच्या पत्नी, राष्ट्रीय स्तरावरच्या तोलामोलाच्या कार्यकर्त्या आणि वसंतराव पळशीकर यांच्या भगिनी म्हणून माझ्या नात्यातीलही माझी बहीण वेणू हिच्या नणंद. माझ्या मनात त्यांच्याविषयी प्रेमादराची भावना. यामुळे माझा नकार मला बाजूला ठेवावा लागला.

आम्ही विनोबांच्या समोर बसलो. विनोबा प्रेमभाई, रागिणीताईंना ओळखत होते. त्यामुळे त्यांनी तिसरा मी तो दाभोलकर असे ओळखले व ओळखीने निर्देश केल्याप्रमाणे वरील क्रमाने आमचा नामनिर्देशही केला.

बालविजय तेथे होते. मी त्यांना विचारले, 'माझा प्रश्न विनोबांच्याकडे दिला का?' ते म्हणाले, 'अजून तशी सवड झाली नाही.' त्यांनी चिठ्ठी विनोबाजींच्याकडे दिली. मी विचारले होते :

'गांधीजींनी एक कविता लिहिली आहे. तिचे शीर्षक 'हे नम्रता के सम्राट' असे आहे. ईश्वराला उद्देशून हे विशेषण अन्य कोणी वापरले आहे का?'

विनोबांनी प्रश्न वाचला. विष्णुसहस्रनामाचे पुस्तक मागवून घेतले. नामावली नजरेखालून घालून ते म्हणाले, 'तसा निर्देश या नामावलीत आढळत नाही. परंतु तसा रवींद्रनाथांनी निर्देश कोठेतरी केला असावा असे वाटते.'

एक दोन वर्षांनंतर ही गोष्ट मी एका गृहस्थांना सांगितली. त्यावेळी ते म्हणाले, 'अहो असे कसे झाले? 'अमानी, मानदो, मान्य:' हे विष्णुसहस्रनामात आहे!' यातील 'अमानी' या विशेषणाने 'नम्रता के सम्राट' चा संपूर्ण आशय व्यक्त होतो असे मला वाटते. परंतु विनोबांना परत विचारण्याची शक्यता आता उरलीच नव्हती.

स्थितप्रज्ञदर्शनाच्या संदर्भात या घटनेचे मला एक आगळेच महत्त्व वाटते. गीतेतील स्थितप्रज्ञ लक्षणांत नम्रतेचा निर्देश नाही. करुणा, प्रेम ही जशी अभावानेच आढळतात, तसेच नम्रतेचेही झाले आहे असे मला आपले नम्रपणे वाटते. चूकही असू शकेल कदाचित.

परंतु विनोबा 'नम्रता' हा सर्वतोपरी गुण मानत होते. याचे आंतरिक दर्शन एकदशव्रतांच्या मांडणीत आहे. 'ही एकदश सेवादी नम्रत्वे व्रतनिश्चये' ही त्या व्रतकारिकेची शेवटची ओळ आहे. सर्व सद्गुणांना नम्रतेचे अस्तर हे हवेच हवे.

अहिंसा सत्य अस्तेय ब्रह्मचर्य, असंग्रह
शरीरश्रम अस्वाद सर्वत्र भयवर्जन
सर्वधर्मी समानत्व स्वदेशी स्पर्शभावना
ही एकादश सेवावी नम्रते व्रतनिश्चये.

एकादश व्रतांचे पालनही 'नम्रत्वे'च झाले पाहिजे असा हा आदेश आहे.

१५ नोव्हेंबर १९८२

भूदानयात्रेला जसे सर्व जग साक्षी होते तसे विनोबांच्या अंतिम प्रायोपवेशन यात्रेलाही होते. भूदान यात्रा हे विनोबांचे कर्मयोगाचे आचरण होते. कर्मयोग आचरणाची विनोबांची दृष्टी स्वच्छ होती.

यात्रा म्हटले की भ्रमण आठवते. पदयात्रा म्हटले की चरण आठवतात आणि चरण म्हटले की 'चरति ।' आठवते. यात्रेचे खरे स्वारस्य 'चरति' या शब्दाच्या सम्यक आकलनात आहे. विनोबांनी त्याचे काही विवरण केले आहे. ('दर्शन' पृ० १८२-१८५.)

विनोबा सांगतात,

"चरति' शब्दाचे हे स्वारस्य आहे. 'चरति' म्हणजे खेळतो, बागडतो. विचरण करतो. त्याच्या जीवनात दुःखच उरत नाही. त्याच्या आत्म्यात जो आनंदाचा झरा आहे त्यात तो मग्न होऊन जातो.'

विनोबा पुढे लिहितात,

"चरति' शब्दाचा याहून एक वेगळा अर्थ सुचविण्यात आला आहे. टिळकांनी तो गीतारहस्यात विवरला आहे. पूर्वीच्या एका श्लोकात 'विषयान् चरन्' अशी पदे आली आहेत. 'चरति' शब्दाने येथे तो अर्थ घ्यावा असे त्यांचे म्हणणे. 'चरति' म्हणजे संयमपूर्वक इंद्रियांचे युक्त व्यापार करतो असा आता अर्थ झाला. हा अर्थही काही गैर नाही. स्थितप्रज्ञ इंद्रियांचे व्यवहार अजिबात करणार नाही, असे नाही. डोळ्यांनी पाहणे, कानांनी ऐकणे इत्यादी त्याला वर्ज्य नाही. सेवेसाठी तो हे सर्व करील.'

विनोबा पुढे सांगतात :

"चरति' म्हणजे 'तो सारखा फिरत राहतो' असाही अर्थ होऊ शकतो. पण हा अर्थ पचवून ज्ञानदेवांनी त्यांतून नवीन आणि सरस निष्पत्ती केली आहे. 'वायूसि एके ठायी। बिढार जैसे नाही। तैसा न धरीच कहीं। आश्रयो जो।। हे

विश्वचि माझे घर। ऐसी मति जयाची स्थिर। किंबहुना चराचर। आपण जाला।।' सगळे विश्वच त्याचे घर झाले. तो घरावाचूनचा नाही झाला! तशीच विचारशीलता ज्ञानदेवांनी याठिकाणी दाखविली आहे. 'चरति' शब्दाचा अर्थ 'विचरे विश्व होऊनी। विश्वमाजी।।' असा त्यांनी केला आहे.'

विनोबांची भूदानयात्रा किंबहुना त्यांची सर्वच जीवनयात्रा याच आशयाची चरितयात्रा होती. या यात्रेत कर्म अटळ आहे. यशापयशही अपरिहार्य आहेत. परंतु यात्रिकाच्या चित्तशुद्धीचे काम या यात्रेत अखंड होत राहिले तर कर्मयोगाच्या खऱ्या आशयाच्या दृष्टीने ती यशस्वीच आहे अशीच विनोबांची 'कर्मयोगा' विषयीची धारणा होती.

परंतु एखाद्याची यात्रा या निकषावर उतरत आहे की नाही हे तरी कोण कसे ठरवणार. प्रत्येकाला विशुद्ध आत्मनिरिक्षणातून स्वतःपुरते हे करता येईल. इतरांचे मूल्यमापन त्याला करता येणार नाही. हा 'अव्यापारेषु' व्यापार कोणी करू नये.

परंतु तरीही मानवाचे निसर्गदत्त आनुवंशिक 'मर्कट' कुतूहल आपल्या मनात जन्मजात असतेच. अशी गमके शोधणाऱ्यांना अशी काही गमके सापडतात किंवा आपल्याला सापडली आहेत असे वाटू लागते.

ती गमके अर्थातच खरी खोटी असू शकतात. परंतु सत्यतेच्या आसपास येणारे सर्वात मोठे व जीवनातील अखेरच्या क्षणीच कदाचित लक्षात येणारे गमक अंतकालातील मनस्थितीचे आहे.

ओमित्याक्षरं ब्रह्म व्याहरन् मामनुस्मरन्। असे ते गमक श्रीकृष्णाने गीतेत सांगितले आहे. विनोबा याही कसोटीला शांतपणे सामोरे गेले.

**ब्रह्म-निर्वाण दर्शन**

विनोबा सांगतात (स्थितप्रज्ञ दर्शन, पृ० १७८):

'स्थितप्रज्ञलक्षणांचा उपसंहार कामना-त्यागाने केला आहे. सर्व कामना सुटल्या म्हणजे जीवनाविषयींचीही सुटली का? याचे उत्तर 'होय' असेच आहे. परंतु अवांतर सर्व कामना सोडल्या तरी जगण्याची वासना शिल्लक राहू शकते. म्हणून मुद्दाम सांगावे लागते की स्थितप्रज्ञाने तीही कामना सोडलेली असते.'

विनोबा पुढे सांगतात:

'जगण्याची इच्छा सोडतो म्हणजे काय मरण्याची इच्छा करतो? नाही. जगण्याच्या इच्छेबरोबर मरण्याची इच्छाही सोडून देतो, असे समजावयाचे. परंतु यामुळे त्याच्या वृत्तीत एकूण औदासीन्यच आलेले असते असे मात्र नव्हे. स्थितप्रज्ञाची स्थिती अगदी उलट असते. जीवनाची अभिलाषा गेल्यामुळे त्याचे मरणाचे भय नाहीसे झालेले असते. मग काय, जीवनात नुसता आनंद व खेळ उरतो. त्याचे जीवन हे लीलामय होऊन जाते. 'तुका म्हणे मुक्ति परिणीली नोवरी। आता दीस चारी खेळी मेळी।' असे त्याचे आनंदाचे जीवन असते. मरणाची भीती नाही परंतु मुमूक्षुही नाही अशी ती स्थिती असते.'

आपले शरीर यापुढे काम करू शकणार नाही हे लक्षात आल्यावर विनोबांनी शरीरत्यागाचा निर्णय शांतपणे घेतला आणि शांत निर्धाराने पार पाडला ही त्यांची विशेषता होती. कोणी 'हा आत्महत्येचा प्रयत्न आहे' अशा स्वरूपाच्या न्यायालयीन याचिकेतून आपल्या अल्पबुद्धीप्रमाणे प्रयत्न केला. 'He is now in God's hands' अशी इंदिरा गांधींची प्रतिक्रिया अधिक संमंजस होती.

अगदी शेवटी शेवटी त्यांच्या शरीराची सर्व शक्ती क्षीण झाली होती. असे असताना त्यांच्या पायाचा अंगठा ताल धरल्यासारखा हालत होता असे सांगतात. तो जपाचा ताल असेल का? असला तर कसला तो जप होता असेल? 'ओम्'चा, 'हरि ओम्' चा की 'बापू बापू' असा. मला तीनही उत्तरे संभवनीय वाटतात आणि यातील कोणतेही उत्तर त्यांच्या स्थितप्रज्ञदर्शनाला विरोधी असणार नाही असे माझे मर्यादित आकलन आहे.

विनोबा तर वेद वेदांत गीता या सर्वांच्याच पलीकडे जाऊन पोचले होते. याचा स्पष्ट तसा निर्देशही त्यांनी रचलेल्या एका श्लोकात आहे. तो श्लोक असा आहे.

वेद वेदांतगीतानां विनुना सार उद्धृतः।
ब्रह्म सत्यं, जगत्स्फूर्तिः जीवनं सत्यशोधनम्।।

वेदवेदांत गीतांचे विनूने सार काढले
ब्रह्म सत्य जगत् स्फूर्ती सत्यशोधन जीवन

(अनुवाद: देवदत्त दा०)

■ ■ ■






# स्थितप्रज्ञाची मूक वेदना

## हरवलेली मुक्ता (शांता) गवसलेली मुक्ता - महादेवीताई ?

देवदत्त दाभोलकर

विनोबांची धाकटी बहीण शांता हिचे हे जन्मशताब्दी वर्ष. विनोबा, शिवाजी, बाळकोबा या त्रयीची नामनिर्देशही येत नसलेली बहीण म्हणून तिची करुण प्रतिमा माझ्या डोळ्यासमोर अनेक वर्षे तरळत आलेली आहे आणि यानंतरही तरळत राहील. अवकाशात 'ताटी उघडा ज्ञानेश्वरा' अशी साद घालणारी तिची मूर्ती माझ्या मनश्चक्षूंपुढे आभासमय आकार घेत राहते.

'ओम शान्तिः शान्तिः शान्तिः' असा लेख विनोबांनी 'मधुकर'मध्ये लिहिला होता. तो तिला उद्देशून असावा का असा निर्देश शिवाजीराव भावे यांनी आपल्या लेखात केला आहे. तो लेख प्रयत्न करूनही अद्याप कुठे उपलब्ध होऊ शकत नाही. अन्यत्र विनोबांनी शांताचा कुठे निर्देश केल्याचे आढळले नाही. कोणाकडून ऐकावयासही मिळाले नाही. तसे संदर्भ मिळाल्यास अनेकांना त्यात मनाची अस्वस्थता कमी करणारे रसायन मिळू शकेल हे मात्र निश्चित.

शांताविषयीचे दोन छोटे लेख (श्री. वि. प्र. दिवाण व श्री. शिवाजीराव भावे यांचे) या अंकात पुढे दिले आहेत. विनोबांनी आपल्या अंतरातील ही स्थितप्रज्ञाची मूक वेदना महिलांसाठी स्थापन केलेल्या ब्रह्मविद्यामंदीर (पवनार) मध्ये आकारित केली असावी अशी मी आपली माझ्या मनाची समजूत घातली होती.

सप्टेंबर २००६ चा 'मैत्री'चा अंक मिळाला. त्यात विनोबांच्या अन्तेवासी महादेवीताई याना भावनांजली अर्पण करण्यात आली होती. महादेवीताईंचे ६ ऑगस्ट २००६ रोजी बंगलोर येथे निधन झाले. त्यानिमित्त त्यात लेख होते. त्यात विनोबांचे महादेवीताईंना लिहिलेले एक पत्रही आहे. (पत्रावर तारखेचा निर्देश नाही. ) त्यात वडील भावाची आपल्या बहिणीवर माया असावी तसा सूर मला जाणवला. ज्ञानेश्वराने मुक्ताला आपली ताटी उघडली आहे असे वाटले. ('परी ते उभयां नच माहिती' असे असणेच शक्यही आहे. निदान महादेवीताईंना नसावे व इतरत्रही विनोबांनी असा कधी निर्देश केला नाही हे निश्चित.)

याचे अनेक वेगळे परंतु मला स्पष्ट वाटणारे गमक गौतम (बजाज) यांच्या लेखात आढळले. ते लिहितात : 'बाबा के महाप्रयाण के १० माह पहले एक दिन मुझे बुलाया और कहा- 'बाबा ने अब सारी चिंताए और कार्य छोड दिये है। केवल दो बातें बची है। एक व्यक्तिगत है - महादेवी की ठीक व्यवस्था हो जाय; दो सार्वजनिक चिंता (गोरक्षा) हो। (संयोग से उसी दिन खबर मिली की महादेवीताई की जो व्यवस्था बाबा चाहते थे, वह हो गयी।)

हे प्रमाण ज्यांना पुरेसे वाटेल त्यांना 'मैत्री'च्या भावनांजलीतील इतर लेखातूनही या दिशेच्या सूचनांचे (लेखकांच्याही नकळत) भान येऊ शकेल.

कदाचित् हे सारेच लोकांना आवडणार नाही. विचित्रही वाटेल. त्यांना एवढ्यावरच समाधान - असमाधान मानावे लागेल.

'ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः'।



विनोबा आश्रम, गागोदे बु.।।
ता. पेण, जि. रायगड -४०२१०७

सादरप्रणाम,

विनोबांची बहीण, कै. शांताबाईचा जन्म गागोद्याला ज्या घरात विनोबा व शिवाजींचा जन्म झाला त्याच घरात दि. ८ एप्रिल १९०६ रोजी झाला. हे वर्ष शांताबाईंचे जन्मशताब्दींचे वर्ष आहे.

विनोबांना एक बहीण होती व तिचा वंश आजही फळतो-फुलतो आहे याची बहुतेकांना माहिती नाही. विनोबांच्या या बहिणीची दखल कुणी घेतली नाही. ते उपेक्षित राहिली व विस्मरणात गेली.



अनुक्रमणिका

शांताबाई म्हणजे 'विनोबा' या महाकाव्यातला करुण-रसातील सर्ग आहे! शांताचा मृत्यू खरोखरच शोचनीय मृत्यु!! विनोबांनी आपल्या आजी-आजोबा, आई-वडील, काका, बंधु यांच्या अनेक आठवणी सांगितल्या आहेत. पण ते कुठेही आपल्या या बहिणीविषयी बोलत नाहीत. अपार दुःख केवळ सामान्य माणसालाच मूक करते असे नव्हे, असीम दुःखाने महापुरुषदेखील मूक होत असावा. म्हणूनच कदाचित विनोबा शांतीविषयी बोलत नाहीत.

शांताबाईचे लग्न वडिलांनी तिच्या वयाच्या १०व्या वर्षी लावून दिले. विनोबांना ते मंजूर नसावे व म्हणूनच ते तिच्या लग्नाला उपस्थित राहिले नाहीत. तो सत्याग्रहच होता. जसा आईच्या अंत्यविधीलाही ते गेले नव्हते. शांतीच्या मृत्यूची बातमी कळताच विनोबांनी ५ ऑगस्ट १९३२ च्या पत्रात वडिलांना लिहिले, 'शांतीच्या मृत्यूची बातमी मिळाली तेव्हा मनात हाच भाव आला की बिचारीला शांती मिळाली. बालविवाहाच्या दुष्परिणामाचे उदाहरण मानण्याकडेच माझ्या मनाचा कल आहे. आजच्या विषम स्थितीत अजून कुठले अनुमान काढता येऊ शकते? तिला शांती मिळो हीच त्या दयाघनाकडे प्रार्थना!'

वडिलांनी बालवयात तिचे लग्न लावून दिल्याने तिची शोकांतिका झाली असे विनोबांना वाटत होते तसेच शिवाजी भावे यांनाही वाटत होते. त्यांनी स्पष्ट शब्दात लिहिले, 'परक्या घरात सेवा करता करता क्षयरोग्याची शुश्रुषा करता करता अविकसित अवस्थेतच अपरिहार्यपणे मृत्यूने तिला सोडविले. याला जबाबदार कोण? आपल्या मुलीची करुण अवस्था करणारे पालक. ही सर्व जबाबदारी निःसंशय त्यांचीच.'

नरहरपंतांनी आपल्या तिन्ही मुलांना - विनोबा, बाळकोबा व शिवाजी यांना शिकवले, पण बडोद्यात कायदा असतानाही त्यांनी शांतीला शिकवले नाही. बालविवाहाचा कायदा तोडून त्यांनी तिचे लग्न लावले. विनोबांचे वडील 'योगी' असले तरी त्या काळच्या या कुप्रथेचे - समाज व्यवस्थेचे ते बळीच होते. शांतीच्या शोकांतिकेला त्या काळची समाज व्यवस्थाच कारणीभूत होती.

बाळकोबांनी एका पत्रात शांतीविषयी लिहिले आहे की तिला वाव मिळाला असता तर ती आमच्यासारखी झाली असती! निवृत्ती, ज्ञानदेव, सोपानदेव यांसारखेच विनोबा, बाळकोबा व शिवाजी हे भाऊ होते. मात्र समाजव्यवस्थेने शांताबाईंना मुक्ता होऊ दिले नाही.

'मुक्ता' होऊ न शकलेल्या उपेक्षित शांताबाईंना त्यांच्या जन्मशताब्दीच्या प्रारंभीला कोटी कोटी प्रणाम!

८ एप्रिल १९०५
सौ. शांताबाई केळकर जयंती

**- वि.प्र.दिवाण**



शांती विनोबांची बहीण. जन्म ८ एप्रिल १९०६. स्थळ - गागोदे. मूळ नाव द्वारका. पण अतिशय शांत स्वभावामुळे शांती नाव पडले. वर्ण सावळा. श्रीकृष्ण काळा, यमुनाही काळी. कोणत्याच शाळेत गेली नाही. पण र ट फ करत वाची. इसापनीती वाची. इसापनीतीतल्या चित्रावरुनच ती गोष्ट सांगे. आई कधी कधी विनोदाने म्हणे, 'तुला काथोड्याकडून विकत घेतली.' मग ती ओक्साबोक्शी रडे. मग आई तिला जवळ घएऊन समजूत करी. मग लगेच हसे. तिला दागिन्याची आवड नव्हती. ती आईचे पाहून सर्व स्वयंपाक शिकली.

शांती मोठी झाली तेव्हा आईला मदत करी. शांती आईला सर्व कामात थोडी थोडी मदत करी. आई जेवताना गोविंद गोविंद म्हणे. तिला घास लागे. तेव्हा शांती पाणी देई.

आई प्रस्तुत लेखकाला आणि शांतीला रोज कंगोरे असलेल्या शिंपीने चंदन हाताला लावी. आम्ही आईकडे दोघे पुष्कळवेळ पाहत असू. आम्हाला वाटे आमची आई देवीच आहे!

आईबरोबर शांती लक्ष्मणमहाराजांच्या मठात कथा-कीर्तनालाही जाई. कमेटी बागेत गेल्यावर तेथले जिवंत असल्यासारखे पुतळे पाहून तिला नवल वाटे. तेथले पेंढा भरलेले वाघ-सिंह पाहून ती भिऊन रडे. आम्ही हात लावू तरी तिला खात्री वाटत नसे.

शांती मला आबा म्हणे. सर्कस पहायला गेलो असता एकदा मला अफाट गर्दीमुळे परत यावे लागले. मी सकाळी हिरमुसला पाहून मला ती काय झाले म्हणाली. मी हकीकत सांगताच ती बाबांकडे गेली व त्यांना सगळी हकीकत सांगितली. मग बाबांनी मला व शांतीला अगदी अगोदर सर्कशीत पुढच्या भागी बसवले. आम्ही सर्कस मनमुराद पाहिली. पण राममूर्तीच्या छातीवर दगड व हत्ती उभा पाहून ती रडू लागली. तिला वाटले आता राममूर्ती चिरडून मरणार. मग बाबांनी समजावले. नंतर एकदा पहिल्यांदाच निघालेला

अनुक्रमणिका






'भस्मासूर मोहिनी' हा मूक सिनेमा आम्ही पाहण्याला गेलो. तसेच 'पानपतचा मोबदला' व 'त्राटिका' नाटकही आम्ही शांतीबरोबर पाहिले.

ती लहानपणी गागोद्याला होती. आणि एकदा जमखंडीला आईबरोबर आम्ही तिघेही गेलो होतो. तेव्हा तिला एकदा रस्त्यात एकटीच सोडून मी रस्त्यात निराळ्याच गल्लीत पळून गेलो. ती घाबरली पण मी कसचा ऐकतो. ती रडू लागली. शेवटी शिपायांनी कोतवालीत तिचा चुरमुरे-फुटाणे देऊन बसविले. तेथे आईच्या माहेरचे स्त्रिया, गोपाळा आणि भीमी होते. त्यांनी तिला घरी आणले. मी भीत भीत घरी आलो. आई म्हणाली, 'काय कारटा आहे, बहिणीला असा छळतो!' मी काहीच बोललो नाही. माराऐवजी बोलणेच खाल्ले तेवढे सही.

मी व शांती आईबरोबर वाईला गेलो. तेव्हा शांती मजबरोबर खेळे. आजोबा मना करीत. आजी म्हणे भाऊबहीण आहेत. खेळायला काय हरकत? आजोबा म्हणत आतापासून मर्यादा शिकवली पाहिजे. आजोबा शांतीला उभीच ठेवीत. मुलीच्या जातीने मोठ्या माणसाबरोबर बसता कामा नये अशी त्यांची शिस्त होती.

वाईहून परत आल्यावर थोड्याच दिवसात (जानेवारी वा फेब्रुवारी १९१६ ला) शांतीचे लग्न झाले. शंकरराव केळकरांशी लग्न लागले. लग्नाची मिरवणूक निघाली तेव्हा शांतीसह आम्ही प्रथम हत्तीवर बसलो. लग्नात सगळे आप्तेष्ट आले होते. विनोबाजी अर्थात नव्हतेच. शांतीचे सासर बडोद्याजवळ कर्जणमियागाव येथे होते. तेथे जमीन-जुमला आणि मोठी घरे होती. गाई आणि दुधदुभते भरपूर होते. लग्नात बडोद्यातले सर्व प्रसिद्ध लोक आले होते.

पुढे शांतीला क्षयरोग झाला. पण घरी म्हणजे सासरी काम करावे लागे. त्यामुळे तो वाढत गेला. अविकसित अवस्थेतच अपरिहार्यपणे मृत्युने तिला सोडवले! शांतीला शोचनीय मृत्यू प्राप्त झाला. तिला तीन मुली होत्या शांतीचा मृत्यु २२ ऑक्टोबर १९३१, म्हणजे पंचवीस वर्षेच ती जगली.

शांतीचा मृत्यु खरोखरच शोचनीय मृत्यु. अशा अनेक भगिनी मरत होत्या आणि मरतील. त्यांची कदर कुणाला आहे? एकदा मुलगी सासरी दिली की सुटलो असे आई-बापांना वाटते. तोपर्यंत हे असेच चालावयाचे.

मोठ्या विचारी संत-सत्पुरुषासारखे तिचे बंधु. पण तिला त्यांचा काही उपयोग? फक्त तिला भाऊबिजेच्या दिवशी आम्ही ओवाळणी घालत असू. तेच पैसे तिने शेवटपर्यंत आपल्याजवळ बाळगून ठेवले होते. तीच भ्रातृप्रेमाची तिची खरी ठेवण.

शांतीविषयी दुःखाने किती लिहिले तरी थोडेच आहे. या भारतातल्या सगळ्याच भगिनी सुखी होवोत. त्यांची दुर्दशा न होवो, त्यांना अकाली मृत्यु न येवो हीच प्रार्थना करावयाची.

शांतीच्या वडीलभावाने - विनोबाजींनी 'महाराष्ट्र धर्मा'त लिहिलेला 'शांति : शांतिः शांतिः' हा लेख तिचे स्मारक मानावे का? माना न माना ती कितीही दुःखी होऊन गेली तरी ती अखेर शांतीच होती!!!

- शिवाजी न. भावे



## मुक्ताई : ताटीचे अभंग - तरंग

योगी पावन मनाचा। साही अपराध जनाचा।।
विश्वरागें झाले वन्ही। सन्तें सुखें व्हावें पाणी।।
शब्दशस्त्रें झाले क्लेश। सन्तीं मानावा उपदेश।।
विश्वपट ब्रह्मदोरा। ताटी उघडा ज्ञानेश्वरा।।

सुखसागर आपण व्हावें। जग बोधें निववावें।।
बोधा करूं नये अंतर। साधु नाहीं आपपर।।
जीव जीवासी पैं धावा। मग करूं नये हेवा।।
तरणोपाय चित्तीं धरा। ताटी उघडा ज्ञानेश्वरा।।

अहो क्रोधे यावें कोठें। अवघे आपण निघोटें।।
ऐसें कललें उत्तम। जन तेची जनार्दन।।
ब्रीद बांधिलें चरणीं। नये दावितां करणी।।
वेले क्रोधाचा उगवला। अवघा योग फोल झाला।।
ऐशी थोर दृष्टी धरा। ताटी उघडा ज्ञानेश्वरा।।

शुद्ध ज्याचा भाव झाला। दुरी नाहीं देव त्याला।।
अवघीं साधनें हातवटीं। मोलें मिलत नाहीं हाटीं।।
अहो आपण तेसें व्हावें। अवघें अनुमानूनी ध्यावें।।
ऐसें केले सत्गुरुनाथें। बाप रखुमादेवी - कांतें।।
तेथें कोणी शिकवावें। सार साधूनियां ध्यावें।।
लडीवाल मुक्ताबाई। जीव मुद्दल ठायींचे ठायीं।।
तुम्हीं तरून विश्व तारा। ताटी उघडा ज्ञानेश्वरा।।

## अल्‌विदा



महादेवी,

हमको एक बात हमेशा याद रखनी चाहिए कि सहजभाव से जितनी सेवा हो सकती है, उतनी करने के अलावा और किसी कर्तव्य की अपेक्षा भगवान ने हमसे नहीं की है। भगवान की भक्ती के साथ जनसेवा एक हद तक आती है। उसके आगे वह भक्ती के लिए बाधक होती है।

जीवन में कुछ बातें प्रारब्ध की होती हैं, कुछ बातें पुरुषार्थ की। हम अपना चित्त निर्मल रखें, यह है पुरुषार्थ की बात। समाज हमारा अच्छा उपयोग करे, यह है ज्यादातर प्रारब्ध की बात। संचित प्रारब्ध क्रियमाण भक्ता अवघा नारायण (भक्त के लिए संचित प्रारब्ध क्रियमाण सब भगवान ही होता है)। तुम्हारे लिए, मेरे लिए भगवत्-आश्रय ही सबकुछ है। बुद्धी में विवेक हो, मन में धीरज हो और हृदय में भगवत्-आश्रय हो, तो संसार-समुद्र मृगजल ही साबित होगा।

विनोबा के
आशीर्वाद.



## ताई : अपने शब्दों में

महादेवीताई

[विनोबा जन्मशताब्दी के समय दिया आशीर्वचन]

योऽन्तः प्रविश्य मम वाचमिमां प्रसुप्ताम्
संजीवयत्यखिल-शक्ति-धरः स्वधाम्ना।
अन्यांश्च हस्त-चरण-श्रवण-त्वगादीन्
प्राणान् नमो भगवते पुरुषाय तुभ्यम्।।

- हे सर्वशक्तिमान! जो तू मेरे हृदय में प्रवेश करके अपने तेज से मेरी सोई हुई वाणी को जगाता है। मेरे हाथ, पैर, कान, त्वचा वगैरह दूसरी इंद्रियों को और प्राणों को संजीवन करता है। ऐसे हे भगवन्! तुझे मैं नमस्कार करता हूँ।

हम महात्मा गांधी, विनोबाजी आदि विश्वमानवों के विश्वकुटुंबी जन हैं। हमारे विचार दूर-सुदूर विश्वभर में फैले हुए अनेक भाषा-भाषियों के साथ जुडे हैं। ऐसे समारोह में उनका दर्शन होता है। परस्पर विचार विनिमय से आत्मीयता बनती है। आज इसकी अत्यंत आवश्यकता भी है।

महात्मा गांधी, विनोबाजी किसी गुफा, मंदिर, मठ या आश्रमों में बैठकर ध्यान-तप किए हुए महापुरुष नहीं थे। बल्कि देश को गुलामी के बंधन से मुक्त करनेवाले महापुरुष थे। और वह भी 'असंग शस्त्रेण दृढेन छित्वा' - अहिंसात्मक

संग्राम-पद्धति से गुलामी के पाश से मुक्त करके देश को स्वतंत्रता प्राप्त करा देनेवाले महापुरुष थे।

उन्होनें कहा था, अपने देश का आधार ग्राम ही है। उसको मजबूत करना है। उन्होंने अपने देश की विषमता, जातिभेद आदि मिटाने के लिए क्या नहीं किया? 'आप बने हरि नाई', नाई बने, जुलाहा बने, भंगी बने। हमारा देश ऐसे ही संत-महात्माओंसे बना हुआ है।

पूज्य बाबाने १४ साल अखंड पदयात्रा देश के कोने-कोने में की। गांव के लोगों की दुर्दशा देखकर इनकी आंखो से कारुण्य-धारा बहती रही। वही आगे जाकर भूदान, ग्रामदानगंगा के द्वारा अनेक दानधाराओं को प्रसृत करती रही। वह एक महान ऐतिहासिक कहानी है।

यह ब्रह्मविद्या-मंदिर का अधिष्ठान पूज्य बाबा की अंतिम संतान है। महिला और ब्रह्मविद्या, वह भी मजदूरी के क्षेत्र में, दीखने में विसंगत दीखेगा। लेकिन बाबा ने इसमें विसंगति मानी ही नहीं, संगति ही मानी और ब्रह्मविद्या के लिए एक नया दालान खोल दिया। आज इसी ब्रह्मविद्या-मंदिर के प्रांगण में बाबा के शताब्दी-समारोह में आप भक्तगण उपस्थित हैं। यहां संडास सफाई, खेती, गोसेवा, रसोई, प्रेस, पत्र-पत्रिकाओं का संचालन, संपादन, बडे-बडे सभा-सम्मेलनों का आयोजन आदि यहां की बहनें करती हैं। यहां पर कर्म-ज्ञान-भक्ति का और वैराग्य, त्याग, स्वच्छता का वातावरण देखने को मिलेगा।

मैं जो आपके सामने खडी हूं, पूज्य बाबा की पचास साल पीर बावर्ची, भिस्ती, खर थी, इसका मुझे पवित्र आनंद है। और इस आश्रमरूपी अश्वत्थ वृक्ष का भी एक छोटा-सा मूल हूं। वृक्ष पनपकर विशाल होता है। बीज के विशाल होने में पर्याप्त योगदान देने का भाग्य मुझे मिला इसका मुझे आनंद है।

बाबा का कर्तृत्व अपार है। मेरे जैसे अल्पमति, अल्प शक्तिवाली क्या वर्णन कर सकेगी? इतनी ही प्रार्थना है -

नमोऽस्तु ते महा योगिन् प्रपन्नं अनुशाधि माम्
यथात्वच्चरणांभोजे रति: स्यादनपायिनी

- हे महायोगेश्वर! तुझे नमस्कार है। मैं तेरी शरण आयी हूं। मुझे ऐसा दान दे कि तेरे चरण-कमलों में मेरा अटल, अखंड प्रेम रहे।



## दबंग महिला

### बालविजय

"बालु! मेरे पास नजदीक बैठो। अब कहीं नहीं जाना। मेरे साथ रहो। घूमना बहुत हुआ। बाबा के साथ भी घूमे हो। कितना घूमोगे। अब यहीं मेरे साथ रहो। गिरजा, बालु के लिए मेरे कमरे में ही बिस्तर लगा दो। वह मेरे साथ ही रहेगा।" करीब सौ साल का हाथ पीठ पर फेरकर ताई बार-बार यही बात कभी हिंदी में, कभी मराठी में तो कभी कन्नड में, अस्पष्ट शब्दों में दोहरा रही थीं। उनकी वाणी में व्याकुलता थी। मेरा तो हृदय भर आया। सारी पूर्व-स्मृतियां चलचित्र के समान नजर आ रही थीं।

महादेवीताई की मृत्यु के करीब दो-तीन माह पहले उनसे मिलने बेंगलोर गया था। सुना था कि बाथरूम में वह गिर गयी थीं। मुझे कहा गया कि वह काफी क्षीण हो गयी हैं और स्मरण-शक्ति कम हुई है। सौ साल के तनावग्रस्त कष्टमय जीवन से शारीरिक कमजोरी आना स्वाभाविक था। स्मरण-शक्ति भले ही कम हुई हो, लेकिन मुझे देखते ही पहचाना। पूर्वस्मृतियां जाग्रत हुईं। ५२ वर्षों का हमारा साथ रहा। महादेवीताई, जयदेवभाई, और मैं हम तीनों पूरी पदयात्रा में दिन-रात बाबा के साथ रहे। मतभेद, विचारभेद, दृष्टिभेद, और स्वभावभेद के कारण आपसी गलतफहमियां पैदा हुई भी हो, लेकिन हमारा आत्मिक संबंध और आंतरिक स्नेहतंतु अटूट रहा। दो तो बाबा की सेवा में पहुंच गये हैं। अब तीसरे को बुलावा आनेकी तैयारी चल रही है। बाबा कहते थे, जो साथी विचारवश, कार्यवश और स्नेहवश इस लोक में इकट्ठे होते हैं वे उस लोक में भी इकट्ठे रहते हैं।

मृदुला साराभाई, आर्यनायकमजी और आशादेवी बाबा से मिलने यात्रा में आये थे। जयदेवभाई ने बाबा को दोपहर का आहार लाकर दिया और नजदीक बैठ गये। मैं वहां पत्रोत्तर लिख रहा था। लोग आपस में बातें कर रहे थे। बाबा का आहार लेना समाप्त होने के बाद मृदुलाबहन ने कहा, "हम लोग बात कर रहे थे कि बापू को जो भाग्य हासिल नहीं हुआ था, वह आपको हासिल हुआ है।" बाबा ने संकेत से पूछा, कौनसा? तब उन्होंने कहा, "आपको जैसे निष्ठावान तत्पर सेवक मिले हैं, वैसे बापू को नहीं मिल सके।" बाबा की मुस्कुराहट में ही सबकुछ था। लोग नहीं जानते कि सेवकों को बनाने का श्रेय

ताई को है। सेवकों को तैयार करना, विश्वासपात्र बनाना, इसमें उनका बहुत बडा हाथ था। उनका व्यक्तित्व ही वैसा था। उनका सतत परिवर्तनशील कोपभाजन और कृपाभाजन वृत्ति की कसौटी में हम खरे उतरे।

ताई का व्यक्तित्व गूढ पहेली जैसा था। युवा अवस्था से लेकर अंत तक उनका जीवन एक मायने में संघर्षमय रहा। शांत और स्वस्थ जीवन जीना शायद उनकी जनपत्री में था ही नहीं। १९३०-३१ का साल। उस समय की रुढिग्रस्त सामाजिक व्यवस्था। एक कट्टर सनातनी ब्राह्मण परिवार की करीब २५ साल की बालविधवा रुढिग्रस्त परंपरा के खिलाफ बगावत करके आजादी के आंदोलन में शामिल होने के लिए घर छोडकर निकल पडती है। यह असामान्य बात थी। झांसी की रानी लक्ष्मीबाई से महादेवीताई का यह कदम कम साहसपूर्ण नहीं था। तभी से ताई का संघर्षमय जीवन शुरु हुआ। १९३०-३२ का आंदोलन थोडा शांत हुआ। ताई की वैराग्यप्रधान आध्यात्मिक वृत्ति पहचानकर श्री जमनालाल बजाज ने उन्हें पहुंचाया बाबा के आश्रम में। उस समय वहां का जीवन अग्निकुंड के सान्निध्य में रहने जैसा था। तरह-तरह की कसौटियों में से उन्हे गुजरना पडा था। संघर्षमय जीवन के आघात - प्रत्याघात - प्रतिक्रियाओं की संमिश्र भावनाओं के ताने-बाने से ताई का मानस बन गया था। इसलिए उनके व्यवहार के बारे में कभी गलतफहमियां भी हुआ करती थीं।

बाबा की भूदान-पदयात्रा में महादेवीताई की अहम् भूमिका रही। व्यवस्थापक, संचालक, मार्गदर्शक, अंगरक्षक, स्वास्थ्य-चिकित्सक, माता, भगिनी, कभी इंस्पेक्टर, कभी जेलर। ये भूमिकाएं इंद्रधनुष के रंग की छटाओं के समान मिली-जुली रहती थीं। इसलिए समय-समय पर कुछ समस्याएं भी निर्माण होती थीं। बाबा विनोद में उन्हें "खटपट ताई" कहते थे। खटपट यानी उठापटक। बहुविध भूमिकाओं को निभाते हुए ताई साथियों को डांटती-फटकारती हुई दिखायी देतीं; तो कभी प्यार से जबरदस्ती खाना खिलाती हुई भी उन्हें देखा जाता था। उनकी डांट और प्यार धूप-छांव के समान अनिश्चित और परिवर्तनीय रहते थे। इसलिए कुछ साथियों को उनका डर भी लगता था। लेकिन उनकी इस मानसिकता से जो परिचित थे, वे निर्भयता से उनके साथ रहते थे।

जीवन की अध्यात्मनिष्ठ बुनियाद के कारण ताई का आत्मविश्वास जबरदस्त था। कोई काम करने का उन्होंने तय कर लिया तो सातत्यपूर्वक उसे प्राप्त करने में जुट जाती थीं, फिर चाहे कितना भी विरोध सहन करना पडे या उसके लिए कष्ट उठाना पडे। कर्नाटक की यात्रा में बाबा ने बेंगलोर में "विश्वनीडम्" आश्रम का विचार रखा था। श्री वल्लभस्वामी को उसका दायित्व सौंपा गया था। परिस्थितिवश उसमें कुछ दिक्कतें आने लगीं। कर्नाटक की कन्या की हैसियत से ताई वल्लभस्वामी की मदद में चली गयीं। 'यया कया च विधया' अथक परिश्रम से एक ढांचा खडा हुआ। वल्लभस्वामी के स्वर्गवास के बाद तो सारी जिम्मेदारी ताई पर आयी। ऐसे प्रकल्पों के लिए आध्यात्मिक वृत्ति और व्यावहारिक दृष्टि के समन्वित प्रयास की आवश्यकता होती है। ताई को अनेक कठिनाइयों का सामना करना पडा। हिम्मत के साथ वे सभी प्रकार की कठिनाइयों का सामना करती रहीं। लेकिन श्री सीताशरण शर्मा, जो कि वहां के प्रमुख कार्यकर्ता थे, की मृत्यू के बाद ताई अंदर से टूट गयी थीं। उसका परिणाम धीरे-धीरे उनके स्वास्थ्य पर भी होने लगा था। स्वभावत: उपलब्ध उनकी प्रबल इच्छाशक्ति कमजोर होती गयी। सृष्टि की व्यवस्था में सर्जन के साथ विसर्जन अवश्यंभावी होता है। जन्म के साथ मृत्यु अटल है। यह जानते हुए भी आत्मीयजनों का वियोग क्षणिक आघात पहुंचाता ही है। अचानक सिद्धार्थ का बेंगलोर से फोन आया कि अभी करीब एक घंटा पहले ताई का स्वर्गवास हो गया। सुनते ही लगा कि 'बालु' इस घरेलू नाम से, कभी प्यार से तो कभी गुस्से से संबोधन करनेवाला अब कोई रहा नहीं।



## सेवाव्रती महादेवीताई

गौतम

आदरणीय महादेवीताई अपने सेवामय जीवन के सौ वर्ष पूर्ण करके गयीं। उम्र के हिसाब से अंत तक स्वास्थ्य ठीक ही था। केवल स्मृति ने साथ छोड दिया था। ११ जनवरी को (२००६) उनके सौ वर्ष पूर्ण होने के अवसर पर उनको प्रणाम करने गया था तो पहचानने में कोई गलती नहीं की, परंतु नाम भूल जाती थीं। और हिंदी में या मराठी में बात करने के बदले कन्नड में बोलने लगती थीं। हिंदी-मराठी भूल-सी गयी थीं। शताब्दी के कार्यक्रम में ढाई घंटे सहजता से बैठी रहीं।

महादेवीताई को सारा भारत पूज्य विनोबाजी की सेविका के नाते जानता है। सेवा कई तरह की होती है और सेवा के मौके भी विविध होते हैं। लेकिन किसी आध्यात्मिक व्यक्तित्व की, साधना के तीव्रता के काल में उनकी सेवा करना कसौटी का काम होता है। बाबा की ऐसी अवस्था में महादेवीताई ने अत्यंत एकाग्रता से धैर्यपूर्वक उत्तम सेवा की। उसका भान बाबा को जीवनपर्यंत था। उत्तर काल में बाबा उनकी बहुत फिक्र रखते थे। बाबा के महाप्रयाण के १० माह पहले एक दिन मुझे बुलाया और कहा - बाबा ने अब सारी चिंताएं और कार्य छोड दिये हैं। केवल दो बातें बची हैं। एक व्यक्तिगत है - महादेवी की ठीक व्यवस्था हो जाये; दो सार्वजनिक चिंता - गोरक्षा हो! (संयोग से उसी दिन खबर मिली कि महादेवीताई की जो व्यवस्था बाबा चाहते थे, वह हो गयीं।)

महादेवीताई एक दबंग महिला थीं। सेवावृत्ति के साथ उनमें वीरवृत्ती भी भरी थी। पुराने कट्टर संस्कारों के परिवार से बाहर आना, एक हरिजन लडकी को पुत्री मानकर संभालना आदि उस जमानें में क्रांतिकारक कार्य ही माना जायेगा। वर्धा में प्रथम जमनालालजी बजाज के पास पहुंचीं। महिलाश्रम में भी रहीं और बाद में बाबा की सेवा में पहुंच गयीं। बाबा की सेवा अत्यंत एकाग्रता से की। उत्तम सेवकों में वल्लभस्वामी और राधाकृष्णजी बजाज के साथ बाबा ताई का नाम भी जोडा करते थे।

मुझे तो जबसे स्मरण है, ताई की याद आती है। बयालीस के आंदोलन में पिताजी और बहुत सारे कार्यकर्ता जेल में थे, तब ताई हमारे घर ही रहती थीं और बच्चों को संभालने से लेकर सब तरह के कामों में मां की पूरी मदद करती थीं। इसलिए हमने बचपन से उन्हें परिवार की सदस्या के रूप में ही जाना।

महादेवीताई ने कई जवानों को आगे बढाया, सेवाक्षेत्र में लाया। यद्यपि मनुष्य को पहचानने की उनकी क्षमता काफी कम थी। उनके भांई रामकृष्ण हेगडे को भी आश्रम लायीं, पढाया। एक साल वे पवनार भी रहे। बाद में राजनीति में गये और कर्नाटक के मुख्यमंत्री भी बने। जयदेवभाई को अपना उत्तराधिकारी उत्तम सेवक बनाया।

ताईजी के अंतिम वर्ष बंगलोर के विश्वनीडम् और वल्लभनिकेतन के कार्य में बीते।

बाबा ने ताईजी को ग्रंथाध्ययन करवाने की भी कोशिश की। लेकिन वह ज्यादा सफल नहीं हुई। पदयात्रा में सुबह-सुबह बाबा उन्हें कुछ पढाते थे। ताई बाद में कहतीं - बाबा पढाते तो हैं, लेकिन मेरा मन वहां न होकर, बाबा के लिए स्टोव पर रखे दूध या पानी आदि की तरफ रहता है। फिर भी कुछ ग्रंथाध्ययन तो हुआ ही। परंतु मुख्य आधार सेवा का रहा। किसी भी बीमार की सेवा वे दिल से करतीं और कभी-कभी सवाई डॉक्टर भी बन जातीं।

उनकी स्मृति में हमारे वंदन!



## हिम्मतवाली बहन

### भाऊ पानसे

उसके बाद शिवरामपल्ली में हुए सम्मेलन के निमित्त बाबा की पदयात्रा प्रारंभ हुई। उसमें दो बहनें - महादेवीताई और मदालसाबहन थीं। ताई नें प्रारंभ से ही बाबा की व्यवस्था का काम संभाला। और किसी भी परिस्थिति में खंड न पडते हुए आखिर तक निभाया। यह भी एक लगन और हिम्मत का काम उन्होंने किया।

अंतिम पंद्रह-बीस साल बेंगलोर के वल्लभनिकेतन की जिम्मेवारी संभाली। उन्हे प्रणाम!



## वज्रादपि कठोराणि मृदूनि कुसुमादपि

### डॉ० गीता मेहता ([illegible]ई)

पू० बाबा के पास महादेवीताई को मैंने कन्यारक्षक के रूप में देखा। आध्यात्मिक प्रेरणा से या सामाजिक कार्य की प्रेरणा से आयी हुई लडकियों को ताई बराबर समझाती थीं कि भाईयोंसे कितना बोला जाये या कैसे व्यवहार करें। शुरु में तो उनकी सिखावन चुभती थी, लेकिन बीस साल के बाद और विशेष करके मेरी लडकियां बडी होने के बाद तो लगता है कि ताई की सिखावन जरूरी और पथप्रदर्शक थी। पुरुषप्रधान समाज में स्त्रियों को हमेशा सचेत और जागृत रहना ही चाहिए।

ताई के मन में कन्याओं के प्रति प्रेम और सहानुभूति थी, लेकिन ऊपर से तो वह कठोर ही थीं - 'वज्रादपि कठोराणि, मृदूनि कुसुमादपि'



# भावनाचार्य विनोबा

## वसंत नारगोलकर

गीताप्रवचनात अनेक ठिकाणी विनोबाजींच्या बाह्यत: रुक्ष वाटणाऱ्या स्वभावातील भावनात्मकता दिसून येईल. त्यांच्या चिंतनात आणि प्रवचनशैलीत आध्यात्मिक काव्यही ओतप्रोत भरलेले आढळून येईल. पण विश्वाविषयी, ईश्वराविषयी, संसाराविषयी आणि मानवी जीवनाविषयी प्रथम पूर्णतया बुद्धिनिष्ठ दृष्टिकोनातून विचार करुनच त्यांनी आपले जीवनविषयक सिद्धांत, जीवनविषयक सूत्रे निश्चित केलेली होती हे आपण लक्षात ठेवले पाहिजे. विनोबाजी गांधीजींप्रमाणेच नेहमी आनंदी असत. गांधीजींप्रमाणेच ते विनोद करुन भोवतालच्यांना हसवीत असत. कोणी 'आठवले' आडनावाचे गृहस्थ आले तर विनोबाजी म्हणायचे : 'हे गृहस्थ आठवले आहेत. हा बाबा (म्हणजे स्वत: विनोबा) विसरले आहे.' ही आडनावाची केवळ शाब्दिक कोटी आहे; पण त्यातूनही विनोबाजींच्या मनात 'जीवनात काही आठवा-वयाच्या गोष्टी असतात, त्या आठवल्या पाहिजेत आणि ज्या विसरावयाच्या असतात त्या विसरल्या पाहिजेत' असा अर्थही अभिप्रेत असण्याचा संभव आहे. विनोबाजींच्या आंतरिक, आध्यात्मिक भावनात्मकतेचे वर्णन करताना विनोबाजींच्या आडनावावरही आपल्याला अशीच कोटी करता येईल. गीताप्रवचनांत 'असे भावीत जावे', 'दिव्य भावना ओता', 'जीवन भावनामय आहे', भावनेत सारे आहे,' 'मुद्दा भावनेचा आहे' असे कितीतरी शब्दप्रयोग सापडतील. त्यावरुन विनोबा हे भावनाचार्य आहेत असे आपल्याला यथार्थपणे आणि गंमतीतही म्हणता येईल.

विनोबाजी बुद्धिनिष्ठ, बुद्धियोगी खरे, पण ते केवळ आधुनिक अर्थाने नव्हे, तर गीतेतल्या अर्थाने 'बुद्धिमान' होते. भगवद्गीतेत 'बुद्धी' शब्द चाळीस-बेचाळीस वेळा आलेला आहे. पण त्या शब्दाचे निरनिराळ्या ठिकाणी अर्थ निरनिराळे आहेत. विनोबाजींनी आपल्या 'गीताई-शब्दार्थ-कोशा'त असे एकूण १५ वेगवेगळे अर्थ दिले आहेत. पण गीतेत दोनतीन अर्थच मुख्य आहेत : एक म्हणजे समत्वबुद्धी, साम्यबुद्धी. फळ मिळाले किंवा न मिळाले तरी मनाचा सारखेपणा न ढळू देणारी स्थिती म्हणजे साम्यबुद्धी. त्याचप्रमाणे सर्वत्र समानपणे भगवद्दर्शन करणारी साधकाची बुद्धी हीही समत्वबुद्धीच. बुद्धीच्या या दोन्ही अर्थांनी विनोबाजी 'बुद्धिमान' होते. तिसरा अर्थ चवथ्या अध्यायाच्या अठराव्या श्लोकातल्या 'बुद्धिमान' या शब्दामध्ये मिळतो. विनोबाजींच्या दृष्टीने तो गीतेचा 'किल्लीचा श्लोक' आहे. तो पूर्वी एकदा या निबंधात उद्धृत केला आहेच. तो श्लोक असा :

कर्मण्यकर्म य: पश्येदकर्मणि च कर्म य: ।
स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्त: कृत्स्नकर्मकृत् ।।

विनोबाजींनी कर्म, विकर्म आणि अकर्म या गीतेतल्या तीन पारिभाषिक शब्दांचा तो जो विशेष अर्थ लावला आहे त्यावरुन विनोबाजी या अर्थाने म्हणजे कर्मात अकर्म पाहणारे आणि अकर्मात कर्म पाहणारे समदर्शी द्रष्टे होते आणि म्हणूनही ते 'बुद्धिमान' होते असे निष्पन्न होते. विशेष ग्रहणशक्ती, विशेष निर्णयशक्ती हा जर नेहमीचा बुद्धी शब्दाचा अर्थ घेतला तर त्या अर्थाने विनोबाजी बुद्धिमंत होतेच होते.

अशा या अनेक प्रकारे बुद्धिमान असणाऱ्या भाष्यकाराची भावनात्मकता गीताप्रवचनात विशेष रीतीने प्रकट झाली आहे व म्हणून ती खुलून दिसते. भावनाचार्य विनोबाजींच्या आध्यात्मिक गद्यकाव्याचे अनेक उत्कृष्ट नमुने गीताप्रवचनांत इकडेतिकडे विखुरलेले सहजपणे आढळतात. फक्त दोनच उतारे येथे दिले तरी त्यामुळे त्यांच्या कविहृदयाची कल्पना येण्यासारखी आहे. ते म्हणतात :

**आणि ती पावन गंगा! मी काशींत असतांना गंगेच्या काठांवर जाऊन बसावयाचा. रात्रींच्या एकांत वेळीं मी जात असें. किती सुंदर व प्रसन्न तो प्रवाह. तिचा तो भव्य गंभीर प्रवाह व तिच्या पोटांत सांठविलेले ते आकाशांतील अनंत तारे. मी मुका होऊन जात असे. शंकराच्या जटाजटांतून येणारी**






> ती गंगा, जिच्या तीरावर राज्ये तृणवत् समजून फेंकून देऊन, राजे तपश्चर्येसाठी येऊन बसत. अशी ती गंगा पाहून मला शांत शांत वाटे. ह्या शांतीचे मी कसे वर्णन करूं? बोलण्याची तेथें सीमा होई... मला या भावना फार पावन व संग्रह करण्यासारख्या वाटतात. मरतांना दोन थेंब गंगेचे तोंडात घालतात. ते दोन थेंब म्हणजे परमेश्वरच मुखांत अवतीर्ण होतो. ती गंगा म्हणजे परमात्मा. परमेश्वराची ती करुणा वाहून राहिली आहे... गंगेच्या ठिकाणी परमेश्वर प्रगट झालेला न दिसेल तर तो कोठें दिसणार?
>
> - 'गीताप्रवचनें' (१९५४), पृ. ११८

अठराव्या म्हणजे शेवटच्या प्रवचनाच्या अखेरीला विनोबाजींनी ज्ञानी मनुष्याच्या अंतिम दशेची, अक्रियावस्थेची कल्पना शब्दांत देण्याचा प्रयत्न केला आहे. ही शेवटची अवस्था अंगी बाणविण्यासाठी कर्माचे कर्तृत्व स्वतःकडे न घेण्याचा सराव करावायाचा असा सल्ला ते साधकाला देतात. ही भूमिका नम्रतेने घेत घेत 'अकर्तृत्ववादा'चा स्वतःमध्ये विकास करावयाचा. मग पुढे काय होईल? विनोबाजी पुढची पायरी खालील शब्दांत स्पष्ट करुन सांगतात :

> परंतु अशानें कर्तृत्व गेलें असें होणार नाहीं. हळूहळू या भावनेचा विकास होत जाईल. आधी मी म्हणजे केवळ तुच्छ आहे. ईश्वराच्या हातातलें बाहुले आहे, तो मला नाचवीत आहे, असे वाटूं दे. त्यानंतर सारे करून, तें या देहाचें आहे, मला त्याचा स्पर्श नाहीं, हें सारें क्रियाजात या मढ्याचें आहे, परंतु मी मढें नाही, मी शव नसून शिव आहे, असे भावीत देहाच्या लेपाने लेशमात्र हि लिप्त होऊं नको. असें झालें म्हणजे देहाशीं जणू संबंधच नाहीं अशी मग ज्ञान्याची अवस्था प्राप्त होईल.
>
> - 'गीताप्रवचनें' (१९५४), पृ. २४७

**'यतो वाचो निवर्तन्ते।'**

विनोबाजींनी गीताप्रवचने "योगयुक्त अंतःकरणाने" दिली होती हे या व अशा अन्य उताऱ्यांवरुन आपल्या लक्षात येते. येथे विद्वत्तेचा प्रश्न नाही, अनुभवाचा प्रश्न आहे. साधकावस्थेतून ज्ञानावस्थेपर्यंत पोचण्याच्या सर्व पायऱ्या विनोबाजींनी स्वत: अनुभविल्या होत्या हे यावरुन सिद्ध होते. गीताप्रवचनांत अनेक वेळा विनोबाजींनी 'येथें भाषा लटकी पडते' , 'येथें खालीं आल्यासारखें वाटतें', 'कोणत्या शब्दांनी वर्णन करावें तें समजत नाही' अशा प्रकारचे उद्गार काढले आहेत. त्याचे कारण उघड आहे. "यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह - जेथे वाणी व मन पोहोचू शकत नाहीत व जी स्थिती शब्दांनी सांगता येणे अशक्य आहे" ती स्थिती शब्दांत व्यक्त करण्याचा हा प्रयत्न आहे. ऋग्वेदकालीन ऋषी वामदेवाच्या अवस्थेचे विनोबाजींनी असेच वर्णन केले आहे. तसेच तुकाराम महाराजांनीही म्हटले आहे :

> **काय सांगू जाले काहींचिया बाहीं,**
> **पुढें चाली नाहीं, आवडीनें।**
> **आनंदाचे डोहीं, आनंद तरंग।**
> **आनंदचि अंग आनंदाचें।।**
>
> **- तुकारामगाथा**

अशा ज्ञानी पुरुषाच्या उत्कट भावावस्थेचा अनुभव विनोबाजी स्वत: घेत असताना प्रस्तुत लेखकासकट अनेकांनी त्यांना पाहिले आहे. विनोबाजींच्या गीताप्रवचनांत त्यांची आध्यात्मिक श्रेष्ठता, त्यांच्या अनुभवाची उच्च पातळी जागोजागी प्रतिबिंबित झाली आहे. त्यांच्या या स्वभाव-विशेषामुळे गीताप्रवचनांची एकंदर रचना अतिशय काव्यमय झालेली आहे.

विनोबाजींना स्वतःविषयी बोलणे, भाषणा-प्रवचनांतून आत्मचरित्रात्मक उल्लेख करणे रुचत नाही. तरी पण गीताप्रवचनांत काही ठिकाणी त्यांनी वरीलप्रमाणेच 'अनुभवाचे बोल' काढलेले आहेत हे ही प्रवचने जरा बारकाईने चाळल्यास लक्षात येते. 'मला असा अनुभव आला आहे' असे जरी कोठेही विनोबाजींनी स्पष्टपणे म्हटलेले नसले तरी अप्रत्यक्षपणे तोच अर्थ त्यांच्या शब्दांतून निघतो. "कोणतेही कर्म ते परमेश्वराचें आहे या भावनेनें केलें तर ते सार्धेच कर्म पवित्र होतें ". यानंतर विनोबाजी म्हणतात : 'ही अनुभवाची गोष्ट आहे.' याचा अर्थ असा की स्वत: विनोबाजींनी जे सूत कातले, जे विणकाम केले, जे भंगीकाम केले ते त्यांनी 'मत्कर्मपरम' होऊन केले. म्हणजे ईश्वराच्या स्मरणाने, ईश्वराच्या नावाने केले. ईश्वरार्पणबुद्धीने केलेल्या क्रियेचा कधी कधी तात्कालिक आध्यात्मिक लाभ मिळतो. हे सांगताना









अनुक्रमणिका

विनोबाजींनी म्हटले आहे की "एका पवित्र क्षणांत एखाद्या वेळेस इतका अनुभव मिळतो कीं तेवढा बारा बारा वर्षांतहि मिळणार नाहीं." अशा पवित्र क्षणाचा अनुभव विनोबाजींनी स्वत: घेतलाच असला पाहिजे म्हणून त्यांनी आपल्या नवव्या अध्यायावरच्या प्रवचनात हे विधान सहजपणे केले आहे. मूर्तिपूजेतील दिव्यतेचे वर्णन करताना विनोबाजी म्हणतात की एका लहानशा वस्तूत, एखाद्या दगडात, सर्व विश्वपरमात्मा-सुद्धा अनुभवण्यास शिकणे म्हणजेच मूर्तिपूजा. तिच्याविषयी त्यांचा आग्रह जसा नाही, तसाच तिचा निषेधही नाही. यानंतर सेवकाने एखाद्या लहानशा खेड्यातही विश्व अनुभवण्यास शिकले पाहिजे असे विनोबाजींनी प्रतिपादन केले आहे. पण लगेच ते म्हणतात, "ही कल्पना नसून प्रत्यक्ष अनुभवाची गोष्ट आहे. " विनोबाजींनी अनेक वर्षे खेड्यातच काम केले होते ही गोष्ट अर्थातच सर्वांना माहीत आहे. शारीरिक अनारोग्याचा जसा मनावर प्रतिकूल परिणाम होतो, तसाच शारीरिक आरोग्याचा मनावर चांगलाही परिणाम होतो असे सांगून पुन: विनोबाजी वरीलप्रमाणेच उद्‌गारतात : "ही अनुभवाची गोष्ट आहे." लहानपणापासूनही आणि गांधीजींच्या जवळ आश्रमात राहायला गेल्यावरही विनोबाजी पुष्कळ वेळा आजारीच असायचे. तेव्हा त्यांनी आरोग्या-अनारोग्याचा मनावर होणारा बरावाईट परिणाम अनुभवलाच असणार. 'नामूलं लिख्यते किंचित्' हे सूत्र विनोबाजींनी वेगळ्याच अर्थाने, केवळ गीताप्रवचनांतच नव्हे तर, अन्यत्रही कसोशीने पाळले होते. विशेषत: आध्यात्मिक बाबतीत आपल्याला स्वतःला अनुभव आल्याशिवाय काही बोलावयाचे-लिहावयाचे नाही असा त्यांचा कटाक्ष होता. आणि म्हणूनच त्यांच्या प्रवचनां-लिखाणांतून त्यांचा अधिकार सतत व्यक्त होत राहत असे. कारण त्यामागे स्वानुभव होता.

### प्रेमभक्तीची पवित्र अश्रुधारा

साधनेच्या प्रारंभिक अवस्थेत विनोबाजींची मुख्य भिस्त ज्ञानमार्गावर होती. नंतर त्यांना भक्तीचे महत्त्व समजून आले. पुढे पुढे त्यांच्यामध्ये भक्तिभावनेचा पुष्कळच विकास झाला होता. ईश्वराविषयी तर त्यांच्यात आत्यंतिक प्रेम होतेच, पण ईश्वर-भक्तांची, संतांची, परमभागवतांची आठवण झाल्यावरही त्यांच्या डोळ्यांतून घळघळ अश्रू वाहायचे. १८५८ साली भूदानपदयात्रेच्या निमित्ताने ते पंढरपूरला आले असताना त्यांनी भल्या पहाटे विठ्ठलमंदिराला भेट दिली. पण त्यापूर्वी ते पुंडलिकाच्या मूर्तीसमोर काही वेळ बसले होते. आम्ही पन्नास- साठ मंडळी त्यांच्याभोवती होतो. त्यांना कोणीतरी खुर्ची आणून दिली होती. खुर्चीवर बसल्यावर त्यांची दृष्टी पुंडलिकाच्या मूर्तीवर गेली आणि जी त्यांच्या डोळ्यांतून अश्रुधारा सुरू झाली ती दोनतीन मिनिटे तशीच वाहत होती. मग त्यांनी स्वतःला आवरले आणि ते रुक्मिणी-विठ्ठलाच्या मुख्य मंदिराकडे गेले. गीताप्रवचनांतही अशा काही घटनांचा उल्लेख स्वतः विनोबाजींनी केला आहे. गांधीजींचे मानसपुत्र श्री. जमनालाल बजाज यांनी वर्ध्याला त्यांच्या मालकीचे लक्ष्मीनारायण मंदीर गांधीजींच्या उपदेशानुसार अस्पृश्यां-साठीही खुले केले. विनोबाजी गीताप्रवचनांत म्हणतात :

> त्यावेळेस मी दर्शनास गेलों होतों. पंधरावीस मिनिटें तें रूप पाहत होतो. माझी समाधि लागल्यासारखी स्थिती झाली. देवाचे ते मुख, ती छाती, ते हात पाहत पाहत मी पायांशी आलों आणि चरणावरच माझी दृष्टी शेवटी स्थिर झाली. 'गोड तुझी चरणसेवा' हीच भावना शेवटीं राहिली.

गीताप्रवचनांत एके ठिकाणी आद्य श्रीशंकराचार्यां बाबत आणि दुसऱ्या ठिकाणी ज्ञानेश्वरांबाबत विनोबाजींनी मोठ्या भक्तिभावाने गौरवोद्‌गार काढले आहेत. त्यांचा उल्लेख मागे आलाच आहे. आईची आठवणही विनोबाजींना कधी रडायला लावी. त्यांच्या या अश्रुधारा पवित्र असत. कारण त्यांत शुद्ध भावनेची उत्कटता असे. एकच व्यक्ती बुद्धिनिष्ठ असूनही भावनाशील कशी असू शकते याचे विनोबाजी हे एक जिवंत उदाहरण होते. विनोबाजींच्या व्यक्तिमत्त्वात आध्यात्मिकता, वैराग्य, भावनोत्कटता, बुद्धिवादिता, भक्ती इत्यादी गुणांचे प्राधान्य होते तरी त्या व्यक्तिमत्त्वाचे खास वैशिष्ट्य दर्शविणारे आणखीही पैलू होते. ते अवगुण म्हणता येणार नाहीत. पण अशा गुणांमुळेच थोर अध्यात्मिक महापुरुषांतही वेगळेपणा आढळून येतो. शंकराचार्य, ज्ञानेश्वर, श्री अरविंद हे तिघेही महान धर्मपुरुष खरे, पण त्यांच्या वृत्तीत, कार्यप्रणालीत, चिंतनपद्धतीत, तत्त्वज्ञानांत आणि स्वभावांतही भिन्नता होतीच. तीच गोष्ट गांधीजी आणि विनोबाजी यांना लागू पडते. दोघेही सर्वोदय विचाराचे महान प्रणेते, ईश्वरनिष्ठ आणि परमभागवतच होते. तरीही दोघांच्या कार्यपद्धतीत आणि स्वभावांत वेगळेपणा होता. गांधीजी कधी










कधी कठोर होऊ शकत असत, पण मुळात ते सौम्य व स्वभावाने गोड होते. त्यांना भोवतालच्या सहकाऱ्यांच्या व्यक्तिगत जीवनात रस असे. त्यांचा विनोद मृदू व न खुपणारा असे. विनोबाजींचा स्वभाव याहून वेगळा होता. विनोबाजी मुळात स्वभावाने तिखट, निर्भीड आणि स्पष्टवक्ते व थोडेसे विक्षिप्तही होते. त्यांचा विनोदात उपहास आणि उपरोध यांचे प्रमाण अधिक असे. आध्यात्मिक दृष्ट्या गांधीजींपेक्षा पूर्वजन्माची अधिक शिदोरी घेऊन विनोबाजी जन्माला आले होते. गांधीजींच्या वैराग्याचा, वासनानिवृत्तीचा प्रारंभ त्यांच्या याच जन्मात झाला होता. विनोबाजी वासनामुक्त होऊनच जन्मले होते असे त्यांच्या बालपणच्या वैराग्यवृत्तीवरून सिद्ध होते. विनोबाजींच्या या साऱ्या विशिष्ट गुणावगुणांची छाप त्यांच्या बोलण्याच्या, भाषणा-प्रवचनांच्या आणि लेखनाच्या पद्धतीवर पडली आहे.



### विचारघन प्रभावी वाक्ये

गीताप्रवचनांत प्रकट झालेल्या विनोबाजींच्या प्रवचनशैलीचा आणखी एक विशेष आपण लक्षात घेतला की त्या पुस्तकाच्या साहित्यिक वैशिष्ट्यांचे विवेचन बहुतांशी पूर्ण झाल्यासारखे होईल. तो विशेष म्हणजे प्रवचनांच्या प्रवाहात अधूनमधून अभावितपणे व्यक्त झालेली स्वत: विनोबाजींचीच काही प्रभावी वाक्ये. विनोबाजींची ही विचारघन, सूत्रात्मक वचने खरोखरी उद्धरणार्थ अशीच आहेत. मात्र त्यांनी ती मुद्दाम रचून उच्चारलेली नाहीत. ती बोलण्याच्या ओघात सहजपणे प्रकट झालेली आहेत. याचे कारण उघड आहे. ज्यांचे चिंतन सतत उच्च पातळीवर आणि आध्यात्मिकदृष्ट्या चाललेले असते, त्यांच्या तोंडून सहजपणे जे बाहेर पडते तेच कालांतराने मोलाचे ठरते. 'यास्तेषां स्वैरकथा: ता एव भवन्ति शास्त्राणि - त्यांच्या ज्या स्वैर, मोकळ्या गप्पा असतात त्यांचीच (पुढे) शास्त्रे होतात' हे विनोबाजींच्या बाबतीतही अगदी खरे आहे.

दुसऱ्या अध्यायातील प्रवचनात मरणाची भीती वाटते ती माणसाला शोभणारी नाही असा विनोबाजींनी युक्तिवाद केला आहे. मरणाच्या भीतीमुळे आज देहाचे जे चोचले माजविले जात आहेत ते योग्य नाही. मरणाची भीती ही देहासक्तीमुळे आहे. देहासक्ती म्हणजे प्रेम नव्हे. देहाची पूजा करणे योग्य नाही. देहाची काळजी तर साधकाने अवश्य घेतली पाहिजे. पण देहाची पूजा हे मानवी जीवनाचे साध्य नाही. म्हणून विनोबाजी म्हणतात :

> **देहासक्ति जाईल तेव्हां देह हें सेवेचें साधन आहे ही गोष्ट कळेल आणि मग देहाला त्याची योग्य प्रतिष्ठाही लाभेल.**

गंगेत स्नानाला गेलेल्या दोन माणसांच्या भिन्न भावनेमुळे एकाला म्हणजे 'हायड्रोजन-ऑक्सिजनवाल्याला' केवळ देहशुद्धीचे तुच्छ फळ मिळते व भावनेने 'ओला' होणाऱ्याला देहशुद्धीबरोबरच चित्तशुद्धीचे अमोल फळ मिळते या दृष्टांतातील सार्वत्रिक सत्य विनोबाजी खालील शब्दांत प्रभावीपणे व्यक्त करतात. 'कर्म तेंच. परंतु भावनाभेदामुळे अंतर पडते. परमार्थी मनुष्याचे कर्म आत्मविकासक होते. संसारी मनुष्याचे कर्म आत्मबंधक ठरतें.' चौथ्या अध्यायात कर्म, विकर्म आणि अकर्म यांचे विनोबाजींनी स्वतःचे खास अर्थ दिले आहेत. विकर्माचा अर्थ 'मनाचा आतून मेळ' असा त्यांनी केला आहे. विकर्मामुळे, आतील भावनेच्या ओलाव्यामुळे, चित्तशुद्धी होते व त्यामुळे कर्माचा कर्मपणा म्हणजे मनुष्याला जन्ममृत्यूच्या फेऱ्यात पुनःपुन: टाकण्याची कर्माची 'बंधक' शक्ती उडून जाते. हे सांगितल्यावर विनोबाजी सहजपणे त्याचे जणू सूत्रच बनवितात व थोडक्यात म्हणतात :

> **चित्तशुद्धीनें केलेलें कर्म निर्लेप असतें. त्याचें पापपुण्य काहीं उरत नाहीं.**

चित्तशुद्धीने केलेल्या कर्माचे पाप उरत नाही म्हणजे ते बंधक ठरत नाही हे आपल्याला समजू शकते. पण विनोबाजी म्हणतात, त्याचे काही पुण्यही उरत नाही. याचा अर्थ सत्कर्मामुळे जे पुण्य मिळते त्याचाही साधकाने त्याग केला नाही तर पुण्यही बंधक ठरते. कारण पुनर्जन्माच्या शास्त्राप्रमाणे पुण्यवान मनुष्ये स्वर्गात जातात खरी. पण पुण्य भोगून संपताच ती मंडळी पुन: मर्त्यलोकाला परत येतात. भगवद्गीता म्हणते :

> क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति । - अ.९.२

सर्वत्र ईश्वर पाहण्याची भावना एकदा चित्तात ठसली की मग साधक निर्भय होतो. कारण तो मग सहजपणे नीतीनेच वागतो. त्याला पापाचे भय राहत नाही. शिवाय रामनामाच्या पुढे पाप उभे राहू शकत नाही. हाच विचार निरनिराळ्या प्रकारे समजावून सांगताना विनोबाजी

उद्‌गारतात :

**परमेश्वर जवळ आहे ही भावना असली म्हणजे सारी दुनिया उलटली तरी हरीचा दास भिणार नाहीं.**

तमोगुण जिंकायचा कसा हे विशद करुन सांगताना विनोबाजींनी शरीर-श्रमांवर भर दिला आहे हा मुद्दा मागे एकदा येऊन गेला आहेच. विनोबाजी शरीरश्रमाची झोपेशीही सांगड घालतात. खरी झोप ही गाढ व निःस्वप्न असते. आपल्यापैकी अनेकांना केवळ स्वप्नेच नव्हे, तर दुःस्वप्नेही पडतात. सेवा करताना होणाऱ्या श्रमांमुळे जर मनुष्य संध्याकाळपर्यंत थकून गेला, तर त्याला रात्री गाढ झोप येईल, ही स्वानुभवावर आधारलेली गोष्ट विनोबाजी सांगतात. त्याअगोदर ते म्हणतात : सेवा करून थकलेल्या साधुसंतांची झोंप म्हणजे तो योगच आहे.

'निद्रा समाधिस्थितिः' हे आद्य शंकराचार्यांचे वचन या संदर्भात आठवते. विनोबाजी भक्तिमार्ग आणि प्रयत्नमार्ग एकच मानतात. पण भक्तीमुळे प्रयत्नमार्गातला कठीणपणा निघून जातो. हे विशद करण्यासाठी विनोबाजींनी कितीतरी चांगले दृष्टांत दिले आहेत. पण त्यांतला एक दृष्टांत विशेष लक्ष आकर्षून घेतो. जमिनीवरुन, खडकावरुन होडी न्यावयाची असेल तर नावाड्याला पुष्कळच श्रम पडतील पण तीच होडी जर पाण्यावर लोटावयाची असेल अथवा वल्हवायची असेल तर श्रम पुष्कळच कमी होतात. विनोबाजी म्हणतात : जीवनात कर्म करण्याबाबत तीच गोष्ट आहे. जीवननौकेच्या खाली जर भक्तीचे पाणी असेल तर कर्माचे श्रमच वाटणार नाहीत. पण ते नसेल तर जीवननौका पुढे नेणे फारच कठीण काम आहे. विनोबाजींच्या शब्दांत याचा सारांश असा : "भक्तितत्त्व जीवननौकेला पाण्याप्रमाणे सुलभता प्राप्त करून देतें."

गीतेच्या सोळाव्या अध्यायातील आसुरी संपत्तीचे वर्णन करताना विनोबाजी आधुनिक दृष्टांत देतात. ब्राह्मण, मुसलमान किंवा ख्रिश्चन यांच्यापैकी अनेकांना आपल्या पूर्वजांच्या किंवा आपल्या संस्कृतीचा अभिमान असतो. यावर विनोबाजी म्हणतात की ज्यांची संस्कृती श्रेष्ठ असेल ती त्यांच्या वागण्याबोलण्यात, वर्तनात आणि राहणीत दिसली पाहिजे. पण तसे सामान्यतः होत नाही. आपली सत्ता, संपत्ती व संस्कृती यांचा ज्यांना अती अभिमान असतो त्या माणसांची गणना असुरांत, राक्षसांत करावयास पाहिजे. आधुनिक दृष्टीने 'आसुरी संस्कृती' कशास म्हणावयाचे या प्रश्नाचे उत्तर विनोबाजींनी खालीलप्रमाणे दिले आहे :

**जी संस्कृती स्वतःच्या जीवनांत नाहीं, स्वतःच्या घरांत नाहीं, ती जगभर फैलावू पाहणे या विचारसरणीला आसुरी म्हणतात.**

गीतेने यज्ञ, दान, तप यांच्याप्रमाणे आहाराचेही सात्त्विक, राजस आणि तामस असे प्रकार वर्णिले आहेत. त्या संदर्भात प्रवचन करताना विनोबाजी आहाराची थोडी चर्चा करतात. आहाराच्या बाबतीतही त्यांची दृष्टी पूर्णपणे आध्यात्मिकच आहे. कारण शरीर हे सेवेचे आणि आध्यात्मिक साधनेचे साधन आहे. आपण जसे एखादे उपकरण अथवा यंत्र वापरतो तसे हे साधन वापरले पाहिजे. म्हणजे काय? वाफेच्या एंजिनात ते एंजिन चालू राहण्यासाठी ज्याप्रमाणे कोळसा टाकावा लागतो किंवा मोटारगाडीत ज्याप्रमाणे पेट्रोल टाकावे लागते, त्याप्रमाणे या शरीररूपी यंत्राचे कार्य चालू राहण्यासाठी त्याला अन्नरूपी कोळसा दिला पाहिजे असे विनोबाजी प्रतिपादितात. या बाबतीत त्यांनी उच्चारलेले छोटेसे वाक्य खरोखरीच उद्धरणार्थ आहे. ते म्हणाले :

**सेवार्थ केलेला आहार पवित्र आहे.**

आपल्या अठराव्या प्रवचनाचा उपसंहार करतानाही विनोबाजींनी आध्यात्मिक साधनेबाबत एक उत्कृष्ट विचार दिला आहे. साधकाने मोक्षाची यत्किंचित् चिंता करता कामा नये. त्याने आपल्या प्रयत्नात जराही ढिलाई येऊ देता कामा नये. सतत प्रयत्न करणे म्हणजेच मोक्ष जवळ आणणे होय. हीच गोष्ट विनोबाजी आपल्या विशिष्ट शैलीत खालीलप्रमाणे मांडतात :

**जेथें साधनेची पराकाष्ठा होते तेथें सिद्धी हात जोडून उभी राहते.**

### विनोबांचे साहित्यविषयक विचार

साहित्यिक दृष्टिकोणातून गीताप्रवचनांची ओझरती समीक्षा करताना स्वतः विनोबाजींचे साहित्यविषयक विचार जाणून घेणे लाभदायी ठरेल. भूदान पदयात्रेत विनोबाजींची उत्तरप्रदेश, बिहार किंवा बंगाल येथील साहित्यिकांशी मुद्दाम भेट घडवून आणण्यात आली होती. अशा भेटीचे मुख्य प्रयोजन विनोबाजींच्या देशव्यापी कार्याचा

लेखकांना व साहित्यभक्तांना परिचय व्हावा, त्या व्यापक आंदोलनामागील मूलभूत विचारप्रणालीची त्यांना ओळख व्हावी व त्यांना तशी सहजप्रेरणा झाल्यास, त्यांनी साहित्यनिर्मितीच्या द्वारा त्या आंदोलनाला गती देण्यास हातभार लावावा हे होते. हा हेतू कितपत साध्य झाला ते सांगता येणे कठीण आहे. परंतु या निमित्ताने विनोबाजींची साहित्या-बाबतींतली मते व कल्पना एकत्रित करण्याची सहज सोय झाली. सर्व सेवा संघ या अखिल भारतीय सर्वोदयी संघटनेने आपल्या प्रकाशन विभागातर्फे विनोबाजींच्या साहित्यविषयक भाषणांचे संकलन करणारी 'साहित्यिकों से' नावाची एक छोटी हिंदी पुस्तिका प्रसिद्ध केली. परंधाम प्रकाशनतर्फे १९५७ मध्ये 'साहित्यिकांशी हितगुज' या नावाचा तिचा मराठी अनुवादही प्रकाशित करण्यात आला. त्या पुस्तिकेच्या पहिल्याच प्रकरणात विनोबाजींनी 'माझी गणना साहित्यिकांमध्ये नाही' असे नम्रतेने व एका अर्थी यथार्थतेने म्हटले आहे. आपल्याला समजलेला साहित्याचा अर्थ स्पष्ट करून सांगताना विनोबाजी म्हणाले :

> साहित्य हा शब्दच सांगतो कीं ती निरपेक्ष वस्तु नाहीं. ती कोणाच्या तरी 'सह' जाणारी वस्तु आहे. जीवननिष्ठेचे प्रकाशन करणें हें साहित्याचें ध्येय आहे... कालिदासानें वाणी आणि अर्थ यांना पार्वती आणि परमेश्वर यांची उपमा दिली आहे. अर्थ म्हणजे जीवन, आणि वाणी म्हणजे साहित्य... साहित्य जीवनाच्या प्रभेच्या रुपानें प्रकट होतें.
>
> राष्ट्राबरोबरच साहित्याचीही उन्नती किंवा अवनती होत असते. त्याप्रमाणे साहित्य जीवनालाही उन्नत किंवा अवनत करूं शकतें.
>
> - 'साहित्यिकांशी हितगुज', पृ. १

या पुस्तिकेत विनोबाजींनी साहित्यविषयक अनेक मुद्द्यांबाबत आपले चिंतन प्रकट केले आहे. साहित्यिक हा सत्यनिष्ठ असला पाहिजे, म्हणजे तो जीवनाशी एकरूप झालेला असला पाहिजे. कलात्मक अनुभूती रसयुक्त, काव्यात्म शब्दांत प्रकट करण्यासाठी साहित्यिकांमध्ये 'अंतरीची तळमळ' पाहिंजे. दिखावटी भावना अथवा करुणा उपयोगाची नाही. साहित्यिक संप्रदायातीत असला पाहिजे. साहित्यात सरळ उपदेश करण्याने रसहानी होते. म्हणून साहित्य सूचक असले पाहिजे. साहित्यातली सूचकता म्हणजेच अहिंसा होय. सरळ सरळ बोध हा आक्रमक म्हणजेच हिंसक असू शकतो. साहित्यिक 'क्रांतदर्शी' असला पाहिजे, त्याला जीवनातल्या वरवरच्या घटनांमागच्या खोल अर्थाचे ज्ञान असावयास पाहिजे, मानवी मनाच्या सूक्ष्म व्यापारांचे, पापुद्र्यांचे आकलन झालेले असले पाहिजे. शिवाय साहित्य स्वल्पाक्षर असले तर ते अधिक रसयुक्त होते. इत्यादी विनोबाजींची अनेक प्रकारची मते या छोट्याश्या भाषण संग्रहात ग्रथित झाली आहेत. त्यात विनोबाजींनी फार पूर्वी दोन पुस्तकांना लिहिलेल्या दोन प्रस्तावनांचाही समावेश आहे. ज्या साहित्यिकांमध्ये सत्यनिष्ठा नाही त्यांचे साहित्य अमर होण्याचा संभव कमी. विनोबाजींच्या दृष्टीने वाल्मिकी, व्यास, कालिदास, शंकराचार्य, ज्ञानेश्वर, तुलसीदास, कबीर, आंध्रमधील तेलगू कवी पोतना, रवींद्रनाथ ठाकूर आणि उत्कट जीवननिष्ठेमुळे गांधीजीसुद्धा श्रेष्ठ साहित्यिक होते. राजाश्रयाच्या आधाराने साहित्य प्रसविणाऱ्या लेखकांची थोर साहित्यिकांत गणना होईलच असे नाही असे विनोबाजींनी निक्षून सांगितले आहे. खरा साहित्यिक अंतःप्रेरणेने लिहितो, तो आश्रयदात्याला किंवा दुसऱ्या कोणाला तरी प्रसन्न करण्यासाठी लेखणी राबवीत नाही. साहित्य अकादमीत साहित्यिकांना बक्षिसे दिला जातात. त्याचा उल्लेख करून विनोबाजी म्हणतात :

> नुकतीच दिल्लीला 'साहित्य अकादमी' स्थापन झाली. सबंध भारतीय साहित्यात 'अकादमी'साठी काहींच शब्द मिळाला नाहीं का? ही गोष्ट मला खटकते. (पण) मी विचार केला कीं नाव काहीं का असेना, काम तर होईल! पण काम काय होते आहे? साहित्यिकांना बक्षिसे दिली जातात. आता विचार करा, जगांत कधी बक्षिसे देऊन काम होतें का? तुलसीदास आणि कबीर यांना कोणतें बक्षिस मिळालें होतें? ... हल्ली प्रत्येक गोष्टीची किंमत पैशांमध्यें केली जाते... साहित्यिकांच्या उपजीविकेसाठी कांहीं पाहिजे हें मी कबूल करतों. परंतु इनाम देण्यानें साहित्यिकांना काय मदत होतें? कारण त्यांच्या जीवनाचा मूळ स्रोत वेगळाच असतो... ज्यांनी लक्ष्मीला दासी नव्हे, पण माता मानले अंशाच

लोकांकडून हिंदुस्थानात साहित्याची वृद्धी झाली आहे...

- 'साहित्यिकांशी हितगुज', पृ. ३५, ३६

## दग्ध आणि विदग्ध वाङ्मय

आजच्या साहित्याविषयी विनोबाजींचे काय मत होते ते जाणून घेतले म्हणजे गीताप्रवचने, गीताई आधी गद्यपद्य रचना करण्यामागे विनोबाजींचा काय हेतू होता ते लक्षात येते. वरील पुस्तिकेत 'विदग्ध वाङ्मय' या मथळ्याचे एक प्रकरण समाविष्ट आहे. मुळात ती एका पुस्तकाला विनोबाजींनी लिहिलेली प्रस्तावनाच होती. तीत विनोबाजी म्हणतात :

> आजच्या घटकेला काव्य, नाटक, कादंबरी, लघुकथा इत्यादी प्रकारांची गणना विदग्ध वाङ्मयात केली जाते. पण केवळ अमुक एका आकारात वाङ्मय आले कीं तेवढ्यानें तें विदग्ध होईल असें नाहीं... काव्य, नाटक, कथादि कितीतरी साहित्य आज असे दाखविता येईल की ज्याची गणनाच करावयाची तर दग्ध वाङ्मयात करावी लागेल. कोणते दग्ध आणि कोणते विदग्ध याची कसोटी दुसऱ्या कोणी न केली तरी काल करीतच असतो... लोकांना काव्य, नाटक, कथादि रोचक होऊं शकतें याचा लाभ घेऊन जें भाराभर साहित्य अनेक भाषांत लिहिलें जात आहे, ते सारें दग्ध साहित्य आहे. आज ना उद्या जळून जायचें आहे. जळून जाण्यापूर्वी अनेकांची हृदये तें जाळून घेत आहे ही दुःखाची गोष्ट आहे.
>
> - 'साहित्यिकांशी हितगुज', पृ. ७२.७३

थोडक्यात म्हणजे जीवनाला उन्नत करणारे जे साहित्य ते विदग्ध साहित्य व जे माणसाला पशूच्या पातळीला जाण्यास प्रवृत्त करू पाहणारे व म्हणून जीवनाला अवनत करणारे साहित्य ते दग्ध साहित्य अशी विनोबांजींची साहित्यविषयक दृष्टी आहे हे उघड होते.

ही कसोटी विनोबाजींच्या स्वतःच्या साहित्यिक कृती आणि विशेषतः गीताप्रवचनांना लावली तर त्या प्रवचनांची आजच 'विदग्ध साहित्यात' गणना झालेली आहे असे दिसून येते. त्याशिवाय कालांतराने त्यांच्यावर कालात्म्याचे आणखी शिक्कामोर्तब होईल ते वेगळेच. आपण वर पाहिलेच आहे की विनोबाजींची गीताप्रवचने अनेक साहित्यिक गुणांनी अलंकृत झालेली आहेत. मागे एकदोनदा सुचविल्याप्रमाणे या पुस्तकाच्या साहित्यिक गुणांचे काहीसे श्रेय सानेगुरुजींनाही द्यावे लागेल. पण मुख्य विचार व शैलीचे बरेचसे पैलू हे विनोबाजींच्याच महान व्यक्तिमत्त्वाचे आविष्कार आहेत यात जरासुद्धा संशय नाही.

विनोबाजींना स्वतःला गुणांचे काहीच महत्त्व वाटलेले नसणार. 'पिसें नेसलें कीं नागवें। तें लोकीं येऊनि जाणावें' अशी त्यांची या बाबतीत स्थिती होती. त्यांच्या दृष्टीने ही प्रवचने त्यांनी 'जपार्थ' केली होती. त्यात ते रंगून गेले होते. या प्रवचनांचा अनेक साधकांना आपल्या जीवनात उपयोग झाला आहे हे समजून मात्र त्यांना धन्यता वाटली असेल. पण त्या प्रवचनांत कोणते साहित्यिक गुण आहेत, कोणते नाहीत हे 'लोकीं जाणावें'. त्यांना त्याबाबत पर्वा नव्हती. सारी जीवनसृष्टीच येथे पूर्णपणे आध्यात्मिक, तेथे साहित्यिक चर्चेला वाव कसा राहणार? आपण ही चर्चा केवळ आपल्या समाधानासाठी, आपल्या आनंदासाठी केली आहे. धर्मग्रंथ अथवा नीतिग्रंथ रुक्षच असले पाहिजेत असा काही नियम नाही. ज्ञानेश्वर महाराजांची ज्ञानेश्वरी किंवा इंग्रज कवी मिल्टन् यांचे 'पॅराडाइज् लॉस्ट' (गमावलेला स्वर्ग!) हे दोन अगदी भिन्न संस्कृतीत, भिन्न देशांत रचले गेलेले ग्रंथ यांचा या बाबतीतली दोन उत्तम उदाहरणे म्हणून निर्देश करता येईल. विनोबाजींचे गीताप्रवचन साहित्यिक दृष्टीने याच कोटीतले आहे, हे आजही दूरदर्शी समीक्षकांच्या ध्यानात येईल; आलेले नसले, तरी ते पुढे तसे निश्चितपणे येईल यात शंका नाही. विदग्ध वाङ्मयाला कधी तत्काल प्रतिष्ठा लाभते, कधी विलंब होतो असे दिसून येते. पण काळाच्या चाळणीत त्याची श्रेष्ठता सिद्ध होऊन अंती ते लोकप्रिय व प्रभावी होतेच असे साहित्याचा इतिहास सांगतो.

(साम्ययोग, पृ० १४०-१४५, पृ० १५९-१६५)



**सहितस्य भावः साहित्यम्।**

अनुक्रमणिका

# गीताचिकित्सा

## भाऊ धर्माधिकारी

एकूण आपण असे समजतो की गीताबोध हा - माणसाने आपले कर्तव्यकर्म निरपेक्षपणे, फळाची इच्छा न ठेवता, करीत राहावे, ते करीत असताना आपला-परका, यश-अपयश, सुख-दुःख, शीत-ऊष्ण या संवेदनांना वा भावनांना थारा देऊ नये - या तात्पर्याचा आहे. निरनिराळ्या भाषेत, निरनिराळ्या रूपांत हे तत्त्वज्ञान गीताग्रंथात मांडण्यात आले आहे. हा बोध करण्याला जे निमित्त निर्माण झाले तेही त्या बोधाइतकेच महत्त्वाचे आहे असे मानून गीतेचा पहिला सबंध अध्याय त्याकरिता दिला आहे. ही पार्श्वभूमी नसेल तर त्या बोधाला संदर्भ राहत नाही, म्हणून तिची आवश्यकता आहे. गीतेचे प्रवचन करणाऱ्या आदिशंकराचार्यांपासून सर्व आचार्यांनी, संतांनी, लो० टिळकांसारख्या पंडितांनी, विवेकानंद-अरविंदांसारख्या योगी पुरुषांनी, म० गांधी-विनोबांसारख्या अध्यात्मवादी समाजक्रांतिकारकांनी हा संदर्भ लक्षात घेतला आहे. मात्र त्यासंबंधी भाष्य करताना दोन भिन्न मते प्रतिपादण्यात आली आहेत. एक मत ऐतिहासिक दृष्टी ठेवून बनविलेले आहे आणि दुसरे आध्यात्मिक दृष्टी ठेवून. म्हणजे, कौरव-पांडव समरप्रसंग हा एक ऐतिहासिक प्रसंग घडून गेला होता व त्यावर व्यास महाकवींनी 'जय' नावाचे महाकाव्य रचले हे एक मत; आणि कौरव-पांडव युद्ध हे माणसाच्या अंतरात नित्य चाललेल्या आसुरी आणि दैवी समरप्रसंगांवरचे रूपक आहे हे मत. या दोन परस्परभिन्न मतांवर आधारलेल्या गीताबोधाचा अर्थ भिन्न रीतीनेच मांडला जाणार हे उघड आहे. उदाहरणार्थ, 'गीतारहस्य' कारांनी आपल्या प्रस्तावनेत सुरुवातीलाच लिहिले आहे : "स्वकीयांबरोबर युद्ध करणे हे मोठे कुकर्म म्हणून खिन्न झालेल्या अर्जुनास त्याच युद्धास परावृत्त करण्यासाठी सांगितलेल्या गीतेत ब्रह्मज्ञानाने किंवा भक्तीने मोक्ष कसा मिळवावा याचे, म्हणजे नुसत्या मोक्षमार्गाचे, विवेचन कशाला, ही शंका मनात येऊन तीच उत्तरोत्तर बळावत चालली. (पृ० ५)... भगवद्गीतेच्या उपक्रमोपसंहारादिकांकडे नजर दिली तर असे आढळून येईल, की भारती युद्धास प्रत्यक्ष प्रारंभ होण्यापूर्वी कुरुक्षेत्रावर दोन्ही बाजूंकडील सैन्ये लढाईस सज्ज होऊन आता एकमेकांवर शस्त्रसंपात करणार, इतक्यात एकाएकी ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगून विमनस्क व संन्यास घेणास तयार झालेल्या अर्जुनास आपल्या क्षात्रकर्मास प्रवृत्त करण्यासाठी भगवंतांनी गीता उपदेशिली आहे..." (पृ० २४). म्हणजे 'गीतारहस्य'कारांनी कौरव-पांडवयुद्ध हा समरप्रसंग खरा मानूनच त्याला अनुलक्षून गीताबोध असल्याचे मानले आहे. बहुतेक सर्व गीताभाष्यकारांचे मत असेच असलेले आढळून येते. विनोबांनी 'गीताप्रवचना'त म्हटले आहे : "अर्जुन रणागंणावर उभा राहिला तो कृतनिश्चयाने आणि कर्तव्यभावनेने उभा राहिला होता. क्षात्रवृत्ती त्याच्या स्वभावात होती... देशोदेशींचे राजे जमवून आणि कृष्णाला सारथ्य पत्करायला लावून तो रणांगणावर उभा राहतो..." (पृ० ४).

पण गांधीजींचे मत याहून वेगळे आहे. ते म्हणतात : "सन १८८८-८९ मध्ये गीतेचे प्रथमदर्शन जेव्हा झाले तेव्हाच मला वाटले, की हा ऐतिहासिक ग्रंथ नाही तर त्यात भौतिक युद्धाच्या वर्णनाच्या निमित्ताने प्रत्येक मनुष्याच्या हृदयात निरंतर चाललेल्या द्वंद्वयुद्धाचेच वर्णन आहे. मानुषी योद्ध्यांची रचना हृदयगत युद्धाला रसिक बनविण्याकरिता उभी केलेली कल्पना आहे. ही प्राथमिक स्फुरणा धर्माचा आणि गीतेचा विशेष विचार केल्यानंतर पक्की झाली. महाभारत वाचल्यानंतर सदर विचार अधिकच दृढ झाला. महाभारत ग्रंथ हा मी आधुनिक अर्थाने इतिहास मानीत नाही..." (अनासक्तियोग, पृ० १६-१७).

पहिले मत गृहीत धरले तर गीताबोध पटून अर्जुन हिंसकयुद्ध करून, शत्रू म्हणून पुढे येणारे कोणी असोत त्यांना मारायला सिद्ध होतो, असे तात्पर्य निघते. कारण हे युद्ध 'यदृच्छया च उपपन्नं' (दैवयोगाने प्राप्त झालेले) असते आणि क्षत्रिय म्हटलेल्याला ते आव्हानरूप असल्यामुळे इतर कोणताही विचार भावना मनात न आणता ते युद्ध करूनच त्याला त्यातून पार पडावे लागते, मग त्यात स्वजनांचा किंवा स्वतःचा संहार खुशाल होवो. येथे प्रेम, कारुण्य, मैत्री, अहिंसा

इ० ना स्थान नाही. येथे फक्त कर्तव्यभावनेचीच क्षिती बाळगलेली आहे आणि कर्तव्यपूर्तीच्या फळाची इच्छा राखलेली नाही. इतकेच अर्जुनाच्या वर्तमानप्राप्त कर्तव्याच्या दृष्टीने पुरेसे ठरते. अ० १८.१७ श्लोक याच विचाराचा द्योतक आहे.

उलट, दुसरे मत गृहीत धरले तर कर्तव्यपूर्तीच्या बाबतीत त्याहून अन्य विचार, भावना यांना स्थान न दिले आणि फलासक्ती न ठेवली तरीसुद्धा "गीतेचे शिक्षण आचरणात आणणाऱ्याला आपोआपच सत्य-हिंसेचे पालन करावे लागते. फलासक्तीशिवाय मनुष्याला असत्य बोलण्याची किंवा हिंसा करण्याची इच्छा होत नाही. कोणतेही हिंसेचे किंवा असत्याचे कार्य आपण पाहू लागलो तर असे आढळून येईल, की त्यामागे परिणामाविषयीची इच्छा दडलेली आहे..." (अनासक्तियोग, पृ० २५).

अशा दोन भिन्न मतांमुळे दोन भिन्न दिशा किंवा दोन भिन्न वळणेच आचाराला मिळतात - दक्षिण आणि उत्तर दिशांइतकी परस्परविरुद्ध. इतके महत्त्व गीताबोधाच्या या पार्श्वभूमीला आहे हे विचारवंतांच्या लक्षात येईल.

युद्ध करणे हे वर्णानुसार येणारे, न टाळता येणारे क्षत्रियाचे कर्तव्यकर्म, म्हणून कृष्णाने उपदेशिल्यावर अर्जुन जेव्हा "नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा" असे १८.७३ मध्ये किंवा त्याही पूर्वी ११ व्या अध्यायाच्या पहिल्या श्लोकात "मोहोऽयं विगतो मम" म्हणतो तेव्हा तो भीष्म-द्रोण यांनासुद्धा ठार मारण्याच्या कर्तव्यात आपण कसूर करणार नाही असेच सांगतो. म्हणजे तो स्थितप्रज्ञ, ज्ञानी, ध्यानी, भक्त अथवा गुणातीत झाला असे समजायचे काय? एवढी प्रतिज्ञा करण्याकरिता दुसऱ्या अध्यायातील ३८ श्लोकांपर्यंतचा कर्मयोगाचा उपदेश पुरेसा होता. पुढचा २.३९ पासून २.७२ पर्यंतचा बुद्धियोग व तदन्तर्गत स्थितप्रज्ञता, किंवा ध्यानयोग किंवा भक्तियोग आणि त्रिगुणातितता यांची प्रवचने करण्याची गरजच काय होती? कर्मयोगात सुख-दुःख, लाभालाभ, जयाजय सम करणे, म्हणजेच कर्माच्या अंती मिळणाऱ्या फळाविषयी निरपेक्ष राहणे हे येतेच. कार्याकार्य विवेचक बुद्धीने एकदा कर्तव्य ठरल्यानंतर त्या कर्तव्यांच्या पूर्तीतच सर्व लक्ष एकत्रित करणे एवढेच उरते. आणि कोणीही सर्वसामान्य बुद्धीचा आणि कुवतीचा माणूस ही गोष्ट करु शकतो. यामुळेच शांती प्राप्त होते, म्हणजे मनाचे अस्वास्थ्य राहत नाही, विवेकबुद्धीची टोचणी राहत नाही, असे बाराव्या अध्यायाच्या बाराव्या श्लोकात सांगितले आहे. मग दुसऱ्या अध्यायाच्या ३९व्या श्लोकापासून १७ व्या अध्यायाच्या २८ व्या श्लोकापर्यंत रचलेले गीताध्याय फुकटच ठरतात, वाजवीपेक्षा उगीचच वाढविलेले ठरतात. एकदा स्वराज्य हे साध्य प्राप्त करण्याकरिता अमुक साधन हे ठरल्यावर त्या साधनावरच सर्व मन-बुद्धी लावून बुद्धीची एकाग्रता करणे, म्हणजेच गीतेच्या भाषेत 'योग' साधणे आणि या साधनभक्तीतच तन्मय होणे म्हणजेच स्वराज्य ही गांधीप्रणीत श्रद्धा आपोआप दृढ होते. या साधनभक्तीत जेवढी स्थितप्रज्ञता, जेवढी ध्यानावस्था, जेवढे ज्ञान, जेवढी गुणातीतता येईल तेवढीच योग्य आणि पुरेशी आहे. या अवस्थांच्या आत्यंतिकतेची कल्पना करून त्या टोकाला पोचण्याची वेगळी साधना उभी करण्याची गरजच काय?

पण हे अर्थात् कार्याकार्यनिश्चितीनंतरचे कार्य आहे. 'व्यवसायात्मिका बुद्धी' त्यावर निश्चित होते, स्थिर होते. पण 'कार्याकार्यव्यवस्थिती' करण्याची प्रक्रिया करताना काय करावे लागते ती अधिक महत्त्वाची गोष्ट आहे. 'कार्य' म्हणजे करणे. कर्तव्य ते काय हे ठरविणाऱ्या बुद्धीची अवस्था कशी पाहिजे? काम, क्रोध, लोभ, मोह यांनी लिडबिडलेली बुद्धी कर्तव्याविषयीचा योग्य निर्णय देऊ शकेल काय? सत्य-असत्य, अहिंसा-हिंसा, न्याय-अन्याय यांचा निरपेक्षपणे विचार करण्याची बुद्धीमध्ये शक्ती असली पाहिजे तरच ती योग्य निर्णय देऊ शकेल. ही निरपेक्षपणा मनाच्या वर उठल्यावाचून प्राप्त होणे शक्य नाही. मनाच्या वर उठणे म्हणजे कामना, वासना, लोभ, द्वेष, आसक्ती यांना बाजूला सारणे. "यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति" (जेव्हा तुझी बुद्धी हा मोहाचा उकिरडा ओलांडून जाईल) असे कृष्ण अर्जुनाला म्हणतो. अशी मनाच्या वर उठण्याची शक्ती ज्यांना नसते ते मग निर्णयाकरिता तशा शक्तीच्या मानलेल्या माणसाकडे जाऊन निर्णय मागतात. पण वास्तविक ज्याची त्यालाच ही निर्णयशक्ती असते, फक्त मनाला आवरण्याची गरज असते. मनाला आवरण्याची शक्ती मनःसंयमनाने येते. त्याकरिता इंद्रियनिग्रहाचा अभ्यास आवश्यक आहे. शैशवापासूनच मुलाला वळण लावताना इंद्रियांच्या आहारी मनाला जाऊ न देण्याचा अभ्यास घडला म्हणजे त्या वळणाने वेळीच मनाच्या वर उठण्याची व कार्याकार्य ठरविण्याची शक्ती माणसात येऊ शकते. गीतेत निरनिराळ्या अध्यायकर्त्यांनी आपापल्या






साधनांच्या प्रतिपादनात जे आपापले स्थितप्रज्ञ, योगी, ज्ञानी, भक्त असे आदर्श मांडले आहेत ते वास्तविक एवढ्याच शक्तीचे द्योतक आहेत. मोक्ष, नैष्कर्म्यसिद्धी, वासुदेव-सायुज्यता वगैरे वगैरे जी साध्ये परंपरागत विचारांनी चालत आलेली आहेत ती काल्पनिक आहेत; ती बाजूला सारून केवळ व्यवहार्यतेच्या दृष्टीने आपण या मनःसंयम, बुद्धीची स्थिरता इत्यादी साधनांकडे पाहिले पाहिजे, असे मला वाटते. कारण तेच सर्वसामान्य माणसाच्या दृष्टीने आवश्यक आहे, त्याला शक्य आहे. गीतेतील स्थितप्रज्ञ, गुणातीत, ज्ञानी आदी सिद्धांवर पंडितांनी मोठीमोठी प्रवचने करून या अवस्था अवघड करून ठेवल्या आहेत. 'ध्यानयोगाची चिकित्सा' या प्रकरणात हा योग किती व कोणत्या मर्यादेपर्यंत आवश्यक आणि शक्य ते दाखविण्याचा मी बुद्ध्या प्रयत्न केला आहे, तो सर्वसामान्य माणसाला पुढे ठेवूनच. नाही तर 'गीतारहस्य' कारांनी 'सिद्धावस्था व व्यवहार' या प्रकरणात आणि विनोबांनी आपल्या 'स्थितप्रज्ञदर्शना'त जो स्थितप्रज्ञाचा आदर्श गीतावचनानुसारच रेखाटला आहे तो गाठणारा गीतेनेच म्हटल्याप्रमाणे 'मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यति सिद्धये। यततामपि सिद्धानां कश्चिन्मांवेत्ति तत्त्वत:।।' (या सिद्धीच्या प्राप्तीकरिता झटणारा हजारोत एखादा आणि अशा झटणाऱ्यांत यथार्थपणे ज्ञान होणारा क्वचितच) अशीच स्थिती होऊन या आदर्शाविषयीची सर्व प्रवचने केवळ श्रवणीयच राहतील.

कृष्णाची अर्जुनाविषयीची अपेक्षा की त्याने आपले पुढे आलेले कर्तव्य न सोडता व फलाची इच्छा न ठेवता युद्धाकडे लक्ष द्यावे ही २.३८ श्लोकापर्यंत पूर्ण होते हे वर सांगितलेच आहे. म्हणून तो ३९ व्या श्लोकात म्हणतो की. "एषातेऽभिहिता सांख्ये बुद्धि:" - म्हणजे युद्धभूमीवरील कर्तव्याची बुद्धी मी तुला सांगितली. पण माणसाचे हे धर्मयुक्त कर्तव्यकर्म कोणत्या अवस्थेत त्याला लागू होणार नाही ते "बुद्धियोगे तु इमां शृणु" (पण योगाची बुद्धी आता ऐक) असे म्हणून कर्तव्यकर्माचा बंध केव्हा व कशा अवस्थेत सुटतो ते पुढे "कृपणा: फलहेतव:" (फलाचा हेतू ठेवणारे कृपण होत) "योग: कर्मसु कौशल्यम्" (बुद्धीयोग साधणे हेच कर्मातील कौशल्य आहे), "यदा समाधौ ते निश्चला बुद्धि: अचला स्थास्यति तदा योगं अवाप्स्यसि" (जेव्हा तुझी न ढळणारी बुद्धी पक्की स्थिर होईल तेव्हा तुला हा योग लाभेल) असे सांगून तेव्हा मग कर्तव्यकर्माच्या बंधनातून तू सुटशील, ("बुद्ध्या युक्तो यथा पार्थ कर्मबंधं प्रहास्यसि") अन्यथा कर्तव्यकर्म कोणालाच सुटत नाही, असे त्याला बजावले आहे. पुढच्या तिसऱ्या अध्यायकर्त्यानेही हीच गोष्ट उचलून धरून 'कर्तव्यकर्म कोणालाच - म्हणजे माझ्यासारख्यालासुद्धा - चुकत नाही,. म्हणून कर्तव्यकर्म करणे हे अवश्य पण, "जो बुद्धियोग साधून आत्म्याच्या ठिकाणी रत होईल, आत्मतृप्त राहील, कसल्याही आकांक्षा, वासना ठेवणार नाही त्याला काही करावयाचे राहत नाही" (३.१७) असे सांगितले आहे. या आत्मतृप्त माणसाचे, म्हणजे ज्याची बुद्धी आत्म्याच्या ठिकाणी स्थिर झाली त्या स्थितप्रज्ञाचे, वर्णन अर्जुनाच्या तोंडी प्रश्न घालून त्याच्या उत्तरी दिले आहे. तशी स्थितप्रज्ञ होण्याची साधना व सिद्धी ही स्वतंत्र आहे हेच त्या दुसऱ्या अध्यायाच्या ३९ व्या श्लोकापासून ७२ व्या श्लोकापर्यंत केलेल्या प्रवचनात सुचविले आहे. म्हणून स्थितप्रज्ञ होण्याचा आदर्श गाठणे ही एक स्वतंत्र व विशेष आध्यात्मिक साधना मानलेली आहे, सर्वसामान्य लोकांच्या बाबतीत त्यांनी आपले कर्तव्यकर्म "सुखदुःख, लाभालाभ, जयाजय सम करून, म्हणजे त्याविषयी निरासक्त राहून, बजावले असता ते पापापासून मुक्त राहतात" असा तात्पर्यार्थ निघतो.'

आदर्श स्थितप्रज्ञ हा "वीतरागभयक्रोध: मुनि:" म्हटला आहे. अशा व्यक्तीमध्ये शत्रुत्वाची भावना, त्याला जीवे मारण्याची वृत्ती, त्याचा पाडाव करण्याची खुमखुम ही सर्व शमलेली असणार हे उघड आहे. अशा व्यक्तीला समाजात वागताना सर्वत्र आत्मरूप दिसत असणार, म्हणजे भय-क्रोध-आसक्तीला जागाच नसणार, पण व्यवहार करताना सत्याच्या-न्यायाच्या स्थापनेकरिता झगडावे लागते तर स्वतः स्वतःशीच झगडत आहे अशा रीतीनेच ते झगडणे होणार, अर्थात् हिंसात्मक न होता, असत्यात्मक न होता, सत्य-अहिंसेला धरूनच होणार, हा गांधीजींचा अभिप्राय येथे लागू होतो. इतर सर्व मते चुकीची ठरतात. अध्याय २ मधील ३८ व्या श्लोकापर्यंत घेतलेली क्षत्रियाची भूमिका आणि पुढची बुद्धियोगाची भूमिका या अगदी परस्परभिन्न भूमिका आहेत हे लक्षात घेतले पाहिजे. म्हणून गीतेतील पुढचे सर्व अध्याय बुद्धियोगाची साधना धरून प्रतिपादलेले आहेत हे स्पष्ट आहे. "कायेन मनसा बुद्ध्या केवलै: इन्द्रियै: अपि। योगिन: कर्म कुर्वन्ति संगं त्यक्त्वा आत्मशुद्धये।।" (५.११) (काया-मन-बुद्धी, नव्हे










केवल इंद्रियांनीसुद्धा योगी कर्म करतात ते आत्मशुद्धीकरिता) असे म्हटले आहे. या दृष्टीने पुढे सहाव्या अध्यायात झालेल्या ध्यानयोगी, नवव्यातील ज्ञानयोगी, १२ व्यातील भक्तयोगी किंवा १४ व्यातील गुणातीत योगी हे यांना त्या रीतीने बुद्धियोगाधिष्ठित आदर्श आहेत असे म्हटले तर ते अयथार्थ होणार नाही. बुद्धियोगाची साधना ही समाधियोगासारखी किंवा हटयोगासारखी स्वतंत्र साधना आहे आणि मनुष्याच्या जीवनातील तो एक पुरुषार्थ आहे असे म्हणणे योग्य होईल. सर्वसामान्यांपैकी ज्या कोणाला जीवनातील हा महापुरुषार्थ साधण्याची इच्छा असेल त्याने तो अवश्य साधावा. रोजच्या व्यवहारातले उदाहरण द्यायचे झाले तर पी०एच०डी० होण्यासारखे हे आहे. पण असा लाखात एखादाच निघतो. म्हणून काय इतर सर्वांचे जीवन विफल मानायचे? दुसऱ्या अध्यायाच्या ३८ व्या श्लोकापर्यंत जो उपदेश कृष्णाच्या तोंडी आहे तो जरी तेथे प्रसंगानुसार क्षत्रियाला लागू वाटला तरी त्यातून फलाशेविना कर्तव्यपूर्तीचा जो संदेश आहे तो जीवनसाफल्यच मानणारा आहे. "नैवं पापमवाप्स्यसि" असे ३८ व्या श्लोकात म्हटले आहे. "स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात्" (२.४०) (या धर्माचा अल्प आचारसुद्धा महान भयापासून रक्षण करतो) हे या कर्मयोगालाही लागू आहे. कर्मयोग साधून होणाऱ्या कर्मांनी चित्तशुद्धी होते. म्हणजे मनाचे खळमळ धुऊन जातात, मन शांत होते, बुद्धीचे फाटे संपून एकाग्र होण्याची तिच्या शक्ती येते. ही केवढी संप्राप्ती आहे! आणि ती प्रत्येक माणसाला आपल्या जीवनात साधणे शक्य आहे.

आपण ज्याला 'जीवन' म्हणतो ती काय वस्तू आहे? जीवन म्हणजे नुसते जगणे नव्हे, आयुष्य नव्हे. तसे तर जननीच्या उदरात जीव आल्यापासून जगात शरीररूपाने येऊन अंती चितेवर किंवा मातीत जाईपर्यंत प्राणी जगतच असतो. पण इतर प्राणी आणि मनुष्यप्राणी यांत जो भेद हे तो जाणिवेचा. माणसाला जाणिवेचा जो विशेष मिळतो तेवढा मनुष्येतर प्राण्यांना नसतो असे दिसून येते. जाणीव म्हणजे बोधशक्ती-बुद्धी. मनुष्यात ही जाणिवकळा निरनिराळ्या अवस्थांत नाना रूपांनी, नाना प्रकारांनी प्रकट होत असते. जन्माला आल्यापासून अमुक वयोमर्यादेपर्यंत बालक अज्ञान असते असे आपण म्हणतो. पण हे म्हणणे तितकेसे बरोबर नाही. त्या वयोमर्यादेनंतर त्याची बुद्धी एकदम विकसित होते असे नाही. जन्मल्याबरोबरच ती विकसनक्रिया सुरु होत असते. तिला अनुकुलता जशी व जेवढी मिळेल त्या मानाने ती क्रिया जलद किंवा मंद गतीने होते, पण ती उमलत जाते ही गोष्ट खरी. म्हणजे तिचा विकासक्रम असतो. किंबहुना देह व बुद्धी ही एकमेकांच्या अनुषंगाने वाढत जात असतात. अर्थात यात दैवाचाही मोठा भाग असतो. एकाला दुसऱ्यापेक्षा अधिक सुदृढ शरीर व इंद्रियशक्ती लाभते, ती दैवाने. दैव हे सदैवच जीवनासोबत गृहीत आहे. जीवन उमलताना अनेक अवस्थांतून ते जात असते. प्रथम शैशव, नंतर कौमार्य, त्यामागून यौवन, मग प्रौढता, मग वार्धक्य आणि शेवटी 'मरणान्तं च जीवितम्' या प्रत्येक अवस्थेत देहाची म्हणजे इंद्रियशक्तींची अमुक वयापर्यंत उत्तरोत्तर वृद्धी होत जात असते, पण पुढे वृद्धीची क्रिया संपून त्या शक्ती क्षीण होऊ लागतात, देह जरठ होण्याच्या मार्गाला लागतो. पण बुद्धीची स्थिती मात्र देहासारखी होत नाही. शैशवात जी जेवढी जाणिवकळा असते ती पुढे वर्धिष्णूच राहते, अनुभवांच्या अन्नाने ती परिपुष्ट होते. देह जरठ झाला तरी बुद्धी जरठ न होता 'वृद्ध' म्हणजे पक्व होते. 'वृद्धत्वं जरसा विना' असे दिलीपराजाविषयी बोलताना रघुवंशात कालिदासांनी म्हटले आहे, ते यथार्थ आहे. मात्र ती बुद्धी कोणत्याही कारणांनी खचलेली नसावी. खचलेली बुद्धी ही आजारी बुद्धी. आणि बुद्धी आजारी होते ती मनाच्या म्हणजे कामना-भावना-आकांक्षा या मनोव्यापाराच्या मागे लागल्यामुळे. त्यामुळे ती थकते, किंवा बाधित होते. मनापासून अलग राहून, मनाकडून काम करवून घेऊन जी स्वतंत्र राहते ती बोधशक्ती ताजी-सतेज राहते. अशी बुद्धीच योग साधू शकते.

इंद्रिये, मन आणि बुद्धी या सर्वांना मी म्हणणारा जो, तो प्रथम सुप्त जाणिवेच्या आणि पुढे जागृत जाणिवेच्या अवस्थेत सतत अनुस्यूतपणे असतो. त्यालाच संस्कृत भाषेत 'आत्मन्' म्हटले आहे. हा आत्मन् देहाच्या अनुषंगाने जीव आणि विश्वतत्त्वाच्या, म्हणजेच ब्रह्माच्या, अनुषंगाने आत्मतत्त्व अशा दोन नात्यांत असतो. जन्मापासून मरेपर्यंत त्याचे स्वतंत्र, अलग अस्तित्व देहात असूनही देहापासून तो वेगळा हे सहज समजण्याजोगे आहे. कारण मनुष्य मेल्यानंतर समोर त्याचा तोच देह पडलेला असतानाही तो नाही हे आपण डोळ्यांनी पाहतो. मेल्यानंतर शरीर पंचतत्त्वांत आणि जीव अथवा मी म्हणणारा आत्मा ब्रह्मतत्त्वात मिळून जातो. तेथे माणसाचे व्यक्तित्व संपले. निरनिराळ्या कारणांकरिता

धार्मिकांनी, अध्यात्मवाद्यांनी त्याच्या मरणोत्तर अस्तित्वाचा सिद्धांत मानला आहे. पण तो केवळ काल्पनिक आहे. त्यातूनच चौऱ्याऐंशी लक्ष योनी, पुनर्जन्म, स्वर्ग, नरक इ. कल्पित कथा मानल्या गेल्या आहेत. गीतेच्या विद्वान् अध्यायकर्त्यांच्या डोक्यातूनसुद्धा या परंपरागत कल्पना गेलेल्या नाहीत. इतकी लोकमानसावर त्यांची पकड बसलेली आहे. पण त्या कल्पना प्रत्यक्ष कधीही कोणाच्याही अनुभवात आलेल्या नाहीत हीही गोष्ट तितकीच सत्य आहे.

जन्मापासून मरेपर्यंत एवढ्याच काळात प्राण्याचा - अर्थात - मनुष्यप्राण्याचादेखील - सर्व व्यापार, सारा मीपणा हे जीवन, वर म्हटल्याप्रमाणे जीवनाच्या सर्व अवस्थांत अमुक मर्यादेपर्यंत शरीर, इंद्रिये, मन-बुद्धी यांचा विकास, त्या मर्यादेनंतर फळाप्रमाणे त्यांची पक्वता आणि पुढे गळून पडणे. हा सृष्टिनियम मनुष्यप्राण्यांसहित सर्वांना लागू. विकासाची क्रिया सुरू असताना, म्हणजे शैशवापासून यौवनावस्थेच्या अखेरपर्यंत सृष्टीतील शक्ती शरीराने, इंद्रियांनी, मनाने, बुद्धीने ग्रहण करण्याचा व्यापार चालत असतो. आपापल्या रीतींनी ही बहिरिंद्रिये व अंतरिंद्रिये काम करीत असतात. ही क्रिया मुक्तपणे होण्याला, सृष्टीतील शक्ती ज्या व जेवढ्या अवश्य त्या व तेवढ्या घेण्याला त्या व्यक्तीला वाव मिळाला पाहिजे. तो मिळाला तरच विकास साधणार. वाव खुंटला की विकास खुंटला, विकास खुंटला की प्रकृतीची विकृती सुरू होते. वाव मिळाल्याने त्या त्या अवस्थेत शक्तीची जी भूक आहे ती भागते. कौमार्यावस्थेत सृष्टीला सर्वांगांनी जाणून घेण्याची भूक, यौवनावस्थेत जे जाणले आणि मिळविले ते कर्मात प्रविष्ट करण्याची आणि त्यापासून मिळणारे भोग मिळविण्याची भूक, प्रौढावस्थेत स्वास्थ्याची भूक आणि वार्धक्यात अनुभवांच्या पुंजीवर अंतर्मुख होण्याची - विसाव्याची भूक या सर्व भुका भागण्याकरिता माणसाला आपल्या शक्तींचा संचय करावा लागतो. म्हणून कौमार्यात बहिरिंद्रिये व अंतरिंद्रिये यांचा संयम आवश्यक असतो. याला उपनिषदात 'ब्रह्मचर्य' असे नाव आहे. आचार्य अशा ब्रह्मचारी कुमारांचे स्वागत करताना म्हणतात :

"आ मायन्तु ब्रह्मचारिण: स्वाहा। वि मायन्तु ब्रह्मचारिण: स्वाहा। प्रमायन्तु ब्रह्मचारिण: स्वाहा। दमायन्तु ब्रह्मचारिण: स्वाहा। शमायन्तु ब्रह्मचारिण: स्वाहा।" (तैत्तिरीयोपनिषद्, चवथा अनुवाद)

(ब्रह्मचारी माझ्याकडे येऊ देत; हे ब्रह्मचारी कपटरहित असोत; ते योग्य रीतीने ज्ञान ग्रहण करोत; त्यांनी इंद्रियांचे दमन करावे; त्यांनी मनःशांती राखावी.)

दुसऱ्या एका उपनिषदात युवकाविषयीच्या अपेक्षा व्यक्त केल्या आहेत :

"युवा स्यात् साधु युवाध्यायक: । आशिष्ठो द्रढिष्ठो बलिष्ठ: । तस्येयं पृथिवी सर्वा वित्तेन पूर्णा स्यात्" (तैत्तिरिय० श्लो. २, अनु. ८)

(युवक सच्छील असावा, अध्ययनशील असावा. भविष्याच्या आशेने पराकाष्ठेचा भरलेला, निश्चयाचा अतिशय पक्का, सर्वोत्तम बलसंपन्न.) युवकाविषयीच्या या किती रसरशीत अपेक्षा व्यक्त झालेल्या आहेत.

याउलट, बृहदारण्यकात आपल्या यौवनकालात जनकराजाच्या राज्यसभेत सर्वांहून श्रेष्ठ ज्ञातेपणाचा पण जिंकून गोधन मिळवणारे याज्ञवल्क्य ऋषी गार्हस्थधर्म पाळल्यानंतर पुढे वानप्रस्थ होताना आपले मिळविलेले सर्व धन आपल्या दोन बायका मैत्रेयी आणि कात्यायनी यांना देऊन निघाले असता मैत्रेयीने विचारले -

"सा होवाच मैत्रेयी यन्नु म इयं भगो सर्वा पृथिवी वित्तेन पूर्णा स्यात् कथं तेन अमृता स्यामिति। नेति होवाच याज्ञवल्क्य: यथैव उपकरणवतां जीवितं तथैव ते जीवितं स्यात् अमृतत्वस्य तु नाशास्ति वित्तेन इति।" (बृहदा० २.४.२-३)

(तेव्हा मैत्रेयी म्हणाली, 'भगवान्, यदाकाचित ही सारी पृथिवी संपत्तीने भरुन मला मिळाली तर त्यायोगे मी अमृत होईन काय?' तेव्हा याज्ञवल्क्य म्हणाले, "होणार नाहीस, साधनसंपन्न असणाऱ्यांचे जसे जीवित तसेच तुझेही होईल. अमृतत्व वित्ताने मिळण्याची आशा नाही.") म्हणूनच तर प्रौढावस्थेत ते स्वत: सर्व वित्ताचा त्याग करुन चालले होते.

या उदाहरणांवरून माणसाच्या जीवनाच्या निरनिराळ्या अवस्थांत निरनिराळे आदर्श भारतीय अध्यात्मवेत्त्यांनी ठेवले होते हे दिसून येते. अर्थात् या सर्व अवस्थांत विवेक आणि मनःसंयम हा अनुस्यूत मानलेला आहे - कुमारवयात ज्ञान संपादन करताना, यौवनात कर्तृत्वसंपन्न होताना आणि इंद्रियविषयांचा आस्वाद घेताना, आणि प्रौढपणी आतापर्यंत मिळविलेल्या अनुभवांचा रवंथ करताना.

माणसाचे हे असे जीवन सुखमय आहे की दुःखमय? ते सुखाचे फार थोडे, दुःखाचेच जास्त असे

माणसांना वाटते. 'सुख पाहता जवापाडे। दुःख पर्वताएवढे।।' याचे कारण सुख हवेहवेसे वाटते, तर दुःख नकोसे वाटते म्हणून ते थोडेसुद्धा जास्त वाटते. वास्तविक एकाच नाण्याच्या या दोन बाजू आहेत, प्रकाश-अंधाराप्रमाणे. जेथे सुख आहे तेथे दुःख लपलेले आहे, जेथे दुःख आहे तेथे सुख लपलेले आहे; कारण एकाच क्रियेची ही दुसरी प्रतिक्रिया आहे आणि या क्रिया-प्रतिक्रियांचा आधार मनुष्याचे मन-इंद्रिये हा आहे. जीवनप्रहारावर सतत उठत राहणाऱ्या त्या लहरी अथवा लाटा आहेत. प्रवाह मागे आहे तोवर लाटा येणारच. पण लाटा म्हणजे प्रवाह नव्हे. लाटा हा प्रवाहाचा विकार आहे असे म्हणता येईल. लाटा नसतानासुद्धा प्रवाह संथ चाललेला असतोच. जीवन हे मूळ संथ प्रवाहासारखे आहे. समुद्रात मोठी लाट आली की माणूस जसा ती डोक्यावरून जाऊ देतो आणि पुन: आपले डोके वर काढतो तशी ही सुखदुःखे जिरवून माणसाने मूळ जीवनाचा संथपणा अनुभवायचा आहे. गीतेत १३ व्या अध्यायकर्त्याने "हा लोक जन्म-मृत्यू-जरा-व्याधी-दुःखांनी भरलेला आहे. त्या दोषांचे दर्शन हे एक ज्ञानाचे गमक" म्हणून सांगितले आहे. सुखदुःखांच्या संवेदनांवरून मनुष्यजीवनाचे असे मूल्य ठरविणे म्हणजे लाटांवरून समुद्राचे मूल्य ठरविण्यारखेच आहे. म्हणून जीवन हे सुखमय आहे की दुःखमय, या प्रश्नाला अर्थ उरत नाही.

खरे म्हणजे, जीवन ही जाणीव माणसाच्या बुद्धीत जेव्हा जागी होते तेव्हा माणसाचे जीवन सुरू होते, आणि वाटते की हे जीवन मी जन्मल्यापासून जे अस्तित्वात आले आहे ते माझ्या इच्छेने आलेले नाही, 'मी' नव्हतोच तेव्हा मी 'झालो' आणि 'मी' नाहीसा होणार त्यालाही माझी इच्छा कारणीभूत होणार नाही. बरे, हे जीवन ज्या परिस्थितीत अस्तित्वात राहिले आहे त्या परिस्थितीवरही माझी सत्ता कमीतकमी आहे, सत्ता दुसऱ्याच शक्तींची आहे. अशा स्थितीत सुखदुःखांच्या तडाख्यांनी बहकून जाऊन 'जन्म नको, जरा नको, व्याधी नको, मृत्यू नको, यांतून सुटले पाहिजे' असा विचार करणे बालिशपणाचे वाटते. चालू जीवन जर तुझ्या इच्छेने चालू झालेले नाही तर पुढचे जीवन (जर असेलच तर) तुझ्या इच्छेवर आणि प्रयत्नावर कसे काय अवलंबून असणार आहे? असा विचार बुद्धीपूर्वक जगणाऱ्याच्या मनात सहज येतो. म्हणून मग शेवटी निष्कर्ष असा निघतो की ज्या सुखदुःखांच्या आघातांनी बावरून जाऊन 'जन्मबंधापासून सुटण्याचा अज्ञानपूर्ण विचार मनात येतो त्या सुखदुःखांना प्राधान्य देण्यापेक्षा चालू जीवन जसे, ज्या अवस्थांतून, ज्या अंतःप्रेरणांनी चाहत आहे तसे वाहू द्यावे, साक्षी म्हणून तटस्थपणे पाहत राहावे आणि प्रसन्नता अनुभवावी. "मन करा रे प्रसन्न सर्व सिद्धीचे कारण। मोक्ष अथवा बंधन सुखसमाधान इच्छा ते।।"

या साऱ्या जीवनव्यापारात गीता माणसांना कोठे आणि कशी उपयोगी होते? माझ्या मताने, यौवनात कर्मे करण्याला प्रारंभ झाल्यापासून कर्मयोगाची ती जी शिकवण देते ती जीवनाच्या शेवटच्या अवस्थेपर्यंत लागू होणारी आहे. शेवटच्या दोन अवस्थांत या कर्मयोगाला बुद्धियोगाची जोड देऊन जीवन सार्थक करण्याला ती मदत करते. दुसऱ्या अध्यायाच्या ३८ व्या श्लोकापर्यंत अर्जुनाला करण्यात आलेला उपदेश त्याचे वर्तमान तात्कालिक कर्तव्यकर्म सांगणारा कर्मयोगाचा आहे आणि मग त्यालाच जोडून सांगितलेला पुढचा २.३९ पासूनचा बुद्धियोगाचा व तदन्तर्गत स्थितप्रज्ञतेचा उपदेश उत्तर जीवनाची पुढची दिशा दाखविण्याकरिता सांगितलेला आहे. ते त्याचे वर्तमान तात्कालिक कर्तव्य म्हणून नव्हे. पण तात्कालिक वर्तमान कर्माचा आचारदेखील पुढच्या दिशेला साहाय्यक असला पाहिजे असा त्या उपदेशाचा रोख आहे. कर्मयोग + ध्यानयोग = बुद्धियोग हे मागे विवेचिलेले समीकरण मात्र सतत लक्षात ठेवले पाहिजे. पुढच्या सर्व अध्यायकर्त्यांनी तत्त्वज्ञाने कोणतीही मानलेली आणि मांडलेली असोत, त्यांनी आपापल्या आदर्शांची नावे भले भिन्न ठेवलेली असोत, पण ते सर्व स्थितप्रज्ञाचेच पर्याय आहेत हे लक्षात घेतले पाहिजे. आणि ते, वर म्हटल्याप्रमाणे, युवावस्थेत आपल्या आतल्या प्रेरणांनुसार आणि शक्तींनुसार जी जी कर्मे, जे जे पराक्रम, ज्या ज्या महत्त्वाकांक्षा आचरायच्या त्या कर्मयोगाचे व्रत न सोडता आचरल्यानंतर प्रौढावस्थेत बुद्धियोगाची जोड देऊन अमलात आणायच्या आहेत हेही लक्षात घेणे अवश्य आहे. अंती जीवनाचे सार्थक 'समाधी-स्थिती'त आहे.

'समाधी!' या शब्दाने आपल्या मनात नेहमी कल्पना येते ती ध्यानसमाधीची. येथे तो अर्थ अभिप्रेत नाही. किंबहुना 'समाधी' या जोडशब्दाचा मूळ अर्थ येथे अभिप्रेत आहे. हा जोडशब्द 'समा+धी' असा आहे. धी म्हणजे बुद्धी-बोधशक्ती- जाणिवकळा. ती सम म्हणजे तराजूच्या समतोल मध्यस्थ काट्याप्रमाणे ना या बाजुला ना त्या बाजुला ढळता








अनुक्रमणिका

एके ठिकाणी स्थिर होण्याची अवस्था. खूप उत्साहाने, आशेने, बलाने विक्रमाची इच्छा पुरवीत कर्मयोगाला न सोडता युवावस्थेत कर्मे केल्यानंतर हा विक्रमाचा वेग उत्तरायुष्यात आवरीत शांत शांत होत जायचे, पसरलेली इंद्रिये व त्यांची शक्ती आवरती घ्यायची, ती अनुभवप्रत करायची, हळूहळू अंतर्मुख होत जायचे, स्वतःमध्ये स्थिर व्हायचे. एकदा कर्मे करण्याचा वेग आवरला की आवेग मावळू लागतात आणि बुद्धिपूर्वक व प्रयत्नपूर्वक आवेगांना शांत करीत गेल्याने बुद्धी सम व स्थिर होत जाते. त्या अवस्थेत आपोआप होत जाणारा साक्षात्कार किंवा स्वानुभूती बृहत्तेची म्हणजे 'स्व'च्या व्यापकतेची आहे. कर्माचा वेग उतरला की ज्ञान प्रकट होऊ लागते, तेजस्वी होऊ लागते, प्रकाश देऊ लागते. जसजसे ज्ञान प्रकाशू लागते, तसतसा त्याचा स्वयंभू आनंद मनुष्य अनुभवू लागतो आणि त्या आनंदाच्या अन्नाने पुष्ट होत होत तो 'आत्मवत् सर्वभूतेषु यः पश्यति स पश्यति' असा पाहणारा-द्रष्टा होतो. ही सहजगती आहे, सहजप्रगती आहे, सहजावस्था आहे. मरणापर्यंतच्या जीवनात अवस्थांतराप्रमाणे हे शेवटी साधले म्हणजे मग साधायचे काय राहिले?

येथे माझ्या मनात जीवनाच्या सार्थक्याविषयीचे माझे विचार मांडायचे काम संपले. मागील २० प्रकरणे गीतेच्या प्रत्येक अध्यायाच्या चिकित्सेला देऊन गीताध्यायातील परस्परविसंगती, तर्क-असंगती आणि गुणदोष विवेचन केल्यानंतर शेवटी माझे स्वतःचे जीवनाविषयीचे विचार, की जे मानीत असल्यामुळे मी गीतेवर टीकाही केली ते, मांडणे अवश्य होते म्हणून हे उपसंहाराचे प्रकरण. ही माझ्या चिकित्सेची विधायक बाजू समजावी. माझ्या स्वतःच्या जीवनातील वर्षानुवर्षे मी कळत-नकळत नित्य गीतेच्या सहवासात राहिलो, जीवन गीताबोधानुसार बनविण्याचा माझ्या शक्ती-मतीप्रमाणे प्रयत्न केला, आणि तो करताना साहजिकच गीतेतील बोधासंबंधी मनात प्रश्न उत्पन्न होत गेले, घोळत राहिले, डिवचत राहिले. शेवटी राहवेना तेव्हा हे प्रश्न माझे मलाच स्पष्ट व्हावेत म्हणून गीतेची अगदी पहिल्या अध्यायापासून शब्दन् शब्दाची चिकित्सा करीत जायचे आणि हाती काय लागते ते निराग्रह बुद्धी ठेवून शोधायचे असे ठरवून त्याप्रमाणे करीत गेलो आणि जे जे हाती लागले ते येथे लेखबद्ध केले. पाहतो तर हा एक ग्रंथच झाला आणि तो माझा मलाच नित्य बोध देणारा ठरला.

आता या उपसंहाराने ग्रंथाची इतिश्री करताना अंतःकरणातल्या भावना ज्ञानदेवांच्या 'पसायदाना'च्या भिक्षेपेक्षा कोणत्या अधिक समर्पक शब्दांत मी मांडू?

"आता विश्वात्मकें देवें। येणें वाग्यज्ञें तोषावें। तोषोनि मज द्यावे। पसायदान हे।। जे खळांची व्यंकटी सांडो। तया सत्कर्मी रती वाढो।। भूतां परस्परें पडो। मैत्र जीवांचें।।"

।। श्री जनतादेवतार्पणमस्तु।।

ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः

[श्री० भाऊ धर्माधिकारी यांच्या 'गीता-चिकित्सा' (श्रीभगवद् गीता संशोधन) प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई, प्रकाशन १९९२, या ग्रंथातील शेवटचे प्रकरण - 'उपसंहार' (प्रकाशकांच्या सौजन्याने).]



## गीता प्रवचने : अमृत-सार

१. गीता हा धर्मग्रंथ नाही.
ते जीवनाचे शास्त्र आहे.
२. स्थितप्रज्ञ होण्यास विद्वत्ता नको.
निरक्षरही स्थितप्रज्ञ होऊ शकतो.
३. पठण, प्रवचने अपुरी आहेत.
खरा प्रश्न आचरणाचा आहे.
४. सर्व धर्म समन्वय हवा.
समन्वयाने सद्धर्माची वृद्धीच होते.
५. ग्रंथांच्या समन्वयाहून
जीवन समन्वय महत्त्वाचा.
६. तत्त्वज्ञानांचा समन्वय
समाज आणि व्यक्ती यांचा समन्वय
देह आणि आत्मा यांचा समन्वय
अंतिमत: या तिहींचाही समन्वय.
७. गीता - साधना काही नाही तरी
अहंकार कमी करावयास मदत करेल.
८. साधना सावधानता.
९. कर्म - विकर्म - अकर्म
निष्काम मानवसेवा.
१०. हे माझे व्यक्तिगत आकलन आहे.
तुमचे वेगळे असावयास प्रत्यवाय नाही.

- विनोबा

# वैज्ञानिकांतील स्पर्धा व सहकार्य आणि त्यांच्या निष्ठा

श्री० मा० भावे

लेखांक पाचवा

(लेविस वोल्पर्ट यांच्या 'दि अननॅचरल नेचर ऑफ सायन्स' या पुस्तकाच्या पाचव्या प्रकरणावर आधारित)

विज्ञानाविषयी ज्या गैरसमजुती आहेत त्यापैकी एक अशी आहे की, वैज्ञानिक हा कोणताही अभिनिवेश न बाळगता सत्याचा शोध घेण्यात गुंतलेला असतो. सृष्टीचा चांगला बोध व्हावा इतकीच त्याची अपेक्षा असते व तसा बोध झाला की त्याला समाधान लाभते. नेमकी त्याच्या विरुद्ध असणारी दुसरी गैरसमजूत आहे ती अशी, की शास्त्रज्ञ हे पुरते स्वार्थी व परस्परांना पाण्यात पाहणारे असतात. या दोन्ही समजुतीत काही सत्यांश असला तरी एकंदरीत त्यामुळे विज्ञानाच्या व्यापारासंबंधात जे चित्र तयार केले जाते ते दिशाभूल करणारे आहे. ही गोष्ट खरी आहे की वैज्ञानिक ज्या संशोधनात रमलेला असतो त्या संशोधनाविषयी तो भाव-व्याकुलही झालेला असतो. आपण कोणत्या क्षेत्रात संशोधन करावयाचे याचा निर्णय घेताना सहकारी वैज्ञानिकांशी केलेला विचारविनिमय उपयोगाचा असतो. त्याचप्रमाणे ते क्षेत्र व त्यातील प्रश्न यांच्याविषयी वैज्ञानिकाला वाटणारी आतुर जिज्ञासा हिचाही वाटा त्या निर्णयात असतो. बरोबरीच्या शास्त्रज्ञांबरोबर होणारी चर्चा हा शास्त्रज्ञाला इतरांशी जोडणारा दुवा असतो. त्याचप्रमाणे बरोबरीचे शास्त्रज्ञ आपले स्पर्धक आहेत ही जाणीवही प्रत्येक शास्त्रज्ञाला असते. स्पर्धा व सहकार्य या दोन्ही गोष्टी संशोधनाच्या बाबतीत उपयोगी, अपरिहार्य व महत्त्वाच्या असतात. बरे, संशोधन करताना संशोधनाचा आनंद शास्त्रज्ञाला सुखावतोच, पण त्याचप्रमाणे संशोधन यशस्वी झाल्यास इतर शास्त्रज्ञात आपला बोलबाला होईल ही अपेक्षाही सुखदायक असते. आपल्या नव्या कल्पनांना समकालीन, सहकारी व स्पर्धाळू शास्त्रज्ञांची मान्यता मिळवावी ही खुमखुमी प्रत्येक संशोधकाची असते. तथापि ही मान्यता कोणत्या कारणांनी मिळते हे गुंतागुंतीचे आहे. इतके खरे की अशी मान्यता तुमच्या कल्पना खऱ्या ठरल्या इतक्यावरच मिळते असे नाही. जुन्या कल्पनांचा त्याग करून नवीन कल्पना सहजी स्वीकाराव्यात असा शास्त्रज्ञांचा कल असत नाही.

शास्त्रीय शोध आणि नवीन कलाकृतींची निर्मिती यात फरक असा आहे की कलाकाराला जसे नाव लाभते त्या प्रकारचा गौरव शास्त्रज्ञांचा होत नाही. शोध महत्त्वाचा असला, एखादे प्रतिष्ठेचे पारितोषिक मिळाले तर शास्त्रज्ञाला तात्कालिक प्रसिद्धी लाभते खरी; परंतु कालांतराने नवा शोध हा मानवजातीच्या ज्ञानसंचितात विलीन होऊन जातो व मग शास्त्रज्ञाच्या नावाला एखाद्या शिक्क्यापलीकडे महत्त्व राहत नाही. कलाकृतीचे तसे नसते. 'मेघदूत' किंवा 'हॅम्लेट' यासारख्या कलाकृती स्वतःच्या अद्वितीमत्वाने कायम झळकत राहतात व कालिदास आणि शेक्सपिअर यांचा गौरव निरंतर होत राहतो. याउलट कलनशास्त्र (कॅल्क्युलस) या शोधाकडे पहा. हे शास्त्र स्थापत्य, तंत्रज्ञान, विज्ञान इत्यादी क्षेत्रात कायम वापरले जाते. पण या शास्त्राचा शोधक कोण, याचा विचार क्वचितच केला जातो. एके काळी या शास्त्राचा कर्ता 'लीब्नेझ की न्यूटन' यावरून भरमसाठ वाद माजला होता. पण विज्ञानाचे इतिहासकार वगळता आता कोणाला त्या वादात स्वारस्य वाटत नाही. नवीन शोध, नवीन कल्पना याचा मनुष्याच्या ज्ञानसंभारात एकदा समावेश झाला की त्यांच्या कर्त्यांची नावे लुप्त होऊन जातात. तसेच हेही लक्षात ठेवण्याजोगे आहे की, ज्या शोधनिबंधातून किंवा पुस्तकातून शास्त्रज्ञांनी आपले संशोधन जगापुढे ठेवले ते मूळ निबंध वा पुस्तके वाचण्याची तसदीही कोणी घेत नाही. पुढील पिढ्यांपर्यंत हे संशोधन पोचते ते क्रमिक पुस्तकांच्या वाटेने. मूळ संशोधकाने आपला शोध ज्या दृष्टिकोनातून व ज्या प्रश्नाच्या संदर्भात मांडलेला असतो त्याचे कौतुक मागाहून कोणाला वाटण्याचे कारण नसते. ज्ञानसंभाराचा भाग झालेला एकेकाळचा क्रांतिकारक शोध दोन-तीन पिढ्यांनंतर एक मामुली गोष्ट बनून राहतो. 'मेघदूत' किंवा 'हॅम्लेट' किंवा 'मोनालिसा' हे चित्र अशा कलाकृती कायमच्या उन्मेषशायी होऊन राहिलेल्या असतात.

विज्ञान हे वर्धिष्णू आहे. त्यामुळे जर नवीन लागलेला शोध मागील कित्येक शोधांना आपल्या कवेत घेऊन पुढे जाणारा असेल, तरच त्या नवीन शोधाला महत्त्व लाभते.

न्यूटनचा गुरुत्वाकर्षणाचा सिद्धांत मोठा ठरला कारण त्यामुळे गॅलिलिओ व केप्लर यांनी लावलेले गतिशास्त्रातील शोध नवीन सिद्धांताचे उपसिद्धांत होऊन गेले. डेव्हिड हिल्बर्ट हा विख्यात गणिती होता, तो सांगत असे की, एखादा संशोधन-निबंध महत्त्वाचा केव्हा समजायचा; तर त्या निबंधामुळे आधीचे किती निबंध बाद झाले, त्या संख्येवरून. पण कलेचे क्षेत्र असे नाही. 'मेघदूत' लिहिले तरी त्यामुळे आधीची कित्येक काव्ये वाचण्याची गरज राहिली नाही असे होत नाही. ज्या अर्थाने विज्ञान हे वर्धिष्णू आहे त्या अर्थाने कला वर्धिष्णू असत नाहीत. विज्ञानातील नवी कल्पना किंवा सिद्धांत याची मान्यता तो सिद्धांत अगर ती कल्पना किती यथार्थ आहे यावर अवलंबून असते; कलाकृतीची यथार्थता किंवा अर्थगर्भता ठरविण्याचा प्रश्नच येत नाही. या सर्व कारणांमुळे कलाकाराची आपल्या व इतरांच्या कलाकृतींकडे पाहण्याची दृष्टी व वैज्ञानिकांची आपल्या व इतर वैज्ञानिकांच्या शोधाकडे पाहण्याची दृष्टी यात मुळातच अंतर पडते.

'समाज-जीवशास्त्र' (सोशिओबायॉलॉजी) नावाची एक विज्ञानशाखा आहे. प्राण्यांच्या जातीत जो व्यवहार चालतो त्याचा जीवशास्त्रीय आधार शोधण्याचे काम या शाखेत चालते. उदा. प्राणी परोपकार करताना कधीकधी आढळतात. समाज-जीवशास्त्रज्ञ लगेच शोधायला लागतात की या परोपकाराच्या मागील जीवशास्त्रीय प्रेरणा काय असावी? शास्त्रज्ञांना वाटते आपले जीन्स जगत-वाचत राहावेत, म्हणून प्राणी परोपकार करतात. मी मरुन माझी भावंडे जगत असतील तर बरे, असा विचार मी करतो कारण माझी भावंडे जगली तर माझ्यातील काही जनुके पुढच्या पिढीत जाण्याची शक्यता वाढणार आहे. माझी भावंडे मेली व मी एकटाच उरलो तर आम्हा सगळ्यांना सामायिक असलेली जनुके पुढील पिढीत जाण्याची शक्यता कमी होते. वैज्ञानिक संशोधनाच्या क्षेत्रात कसे वागतात याच्या विषयीदेखील असेच प्रश्न उपस्थित करता येतील. उदा. आपल्या नवीन शोधाचा प्रसार व्हावा यासाठी वैज्ञानिकाने कसे वागावे? संशोधनाच्या क्षेत्रातील स्पर्धा व सहकार्य यांना कोठवर वाव द्यावा? अशा स्वरूपाचे हे प्रश्न असतील.

समाज-जीवशास्त्रीय पद्धतीने विचार करण्याचे नाकारले तरी हा प्रश्न विचारणे वावगे ठरू नये, की आपण मांडलेले सिद्धांत/कल्पना यांची, आपापल्या संशोधन क्षेत्रात उपयोग करण्यासाठी, इतर संशोधकांनी निवड करावी यासाठी वैज्ञानिकाने कसे डावपेच आखावेत? कारण, इतर वैज्ञानिकांनी आपल्या कल्पनांचा स्वीकार केला म्हणजे मूळ शोधकाचा लौकिक वाढतो; त्याला नवीन संशोधनासाठी पैसे मिळतात; नोकरीत बढती मिळते व इतर अनेक फायदे होतात. याबाबतीत वैज्ञानिकाने स्पर्धा व सहकार्य, स्वार्थ व परमार्थ, या दोन्हीचा योग्य तो मेळ घालणे इष्ट ठरेल. आपल्याला जी माहिती आहे तिचा किती भाग आपल्या सहकाऱ्यांना/स्पर्धकांना समजू द्यायचा व कोणता लपवायचा हे ठरविताना असे मेळ घालण्याची वेळ येते. अलीकडच्या काळात तर याबाबतचे निर्णय घेणे अधिक निकडीचे झाले आहे. कारण बरेचसे संशोधन सांघिक स्वरूपाचे असते. एकाच मनुष्याचा शोधनिबंध ही गोष्ट विज्ञानात आता विरळच दिसते. कधीकधी एकाच शोधनिबंधावर पन्नास संशोधकांची नावेदेखील असतात.

याबाबत आणखी एक पैलू विचारात घेतला पाहिजे. एका विशिष्ट वेळी, एका विशिष्ट क्षेत्रात सुवर्णाक्षरांनी लिहावा असा शोध लागण्याचा मोका फारच कमी असतो. एकदा का तो शोध लागला की, त्याच दिशेने संशोधन करणाऱ्या इतर संशोधकांचे परिश्राम फुकट जातात. त्यामुळे असे वाटण्याचा संभव आहे की, प्रत्येक वैज्ञानिक आपल्याला सुचलेली नवी कल्पना लपवून ठेवण्यासाठीच धडपडत असणे स्वाभाविक आहे. पण ही विचार करण्याची एक बाजू झाली. विज्ञानातील यश हे केवळ एखाद्या चकित करणाऱ्या शोधावर अवलंबून असते, असे नाही; तुमचा हा शोध व त्या शोधाशी निगडित असणाऱ्या संकल्पना इतर शास्त्रज्ञांना उपकारक वाटल्या पाहिजेत. यामुळेच स्पर्धे[illegible]च संघभावनादेखील महत्त्वाची ठरते. परस्पर विरोधी अशा प्रेरणातून संशोधनाची प्रक्रिया पुढे जात असते. तिचा एक परिणाम असा की, प्रत्येक शास्त्रज्ञाला असे वाटत राहते की, आपण एका विशेष जमातीचे घटक आहोत आणि या जमातीचे घटक म्हणून नांदायचे असेल तर आपल्या वर्तनाला काही अलिखित परंतु अनिवार्य अशा स्थितीत आपण बसवले पाहिजे. या शिस्तीचे काही भाग असे सांगता येतील. विज्ञान हा सार्वजनिक ज्ञानसंचिताचा एक अंश आहे; त्यामुळे विज्ञान हे सर्वांस विनामूल्य उपलब्ध झाले पाहिजे. आपला शोध शोध-नियतकालिकात प्रसिद्ध केला पाहिजे व त्याला मानधन मिळण्याची अपेक्षा धरू नये. विज्ञानातील शोध अमुक एका विशिष्ट व नामवंत शास्त्रज्ञाने लावला म्हणून तो स्वीकार्य ठरला असे होत नाही. त्या शोधाला


अनुक्रमणिका

काही मूल्य असेल तरच तो मान्यता पावतो. तिसरे असे की, आज एक शोध मान्यता पावला, म्हणून त्याला कायमची मान्यता मिळाली असे नाही; विज्ञानाची तपासणी निरंतर चालू राहिली पाहिजे. हे जसे वैज्ञानिक पद्धतीविषयीचे नियम झाले तसेच विज्ञानाशी संबंधित सामग्रीच्या बाबतीतील सहकार्याचेही नियम असतात. समजा आण्विक जीवशास्त्राविषयी (मोलेक्युलर बायोलॉजी) एखाद्याने शोध लावून तो शोध-नियतकालिकात प्रसिद्ध केला. या निबंधात त्याने असे जाहीर केले, की आपण काही विशेष जनुके व प्रथिने शोधली आहेत. तर त्या शास्त्रज्ञाची ही जबाबदारी मानली जाते की, या शोधासाठी लागलेली सामग्री दुसऱ्या शास्त्रज्ञांना त्याने पुरविली पाहिजे. एरवी, इतर शास्त्रज्ञांना मूळ संशोधनाची छाननीच करता येणार नाही.

प्रसिद्धी-माध्यमांना हल्ली विज्ञानविषयक बातम्या देण्याचे वेड लागले आहे. विज्ञानाविषयीच्या सनसनाटीपूर्ण बातम्या म्हणजे साहजिकच वैज्ञानिकांतील स्पर्धा व त्यांच्यातील भ्रष्टाचार यांच्याबद्दलच्या बातम्या. एखादा धर्मगुरू व्याभिचारी निघाला तर जशी खळबळ माजते तशीच खळबळ शास्त्रज्ञाचे संशोधन चौर्यातून निष्पन्न झाले आहे किंवा ते खोटे ठरले आहे, अशा प्रकारच्या बातम्यांमुळे निर्माण होते. शास्त्रज्ञ हा भ्रष्टाचारापासून मुक्त व एकाग्र मनाने आपल्या प्रयोगशाळेत संसोधनात मग्न झालेला असतो अशी जी शास्त्रज्ञाची प्रतिमा लोकात आहे, त्या प्रतिमेला शास्त्रज्ञातील स्पर्धेच्या वार्तांमुळे धक्का पोचतो. परंतु, शास्त्रज्ञातील स्पर्धा व भ्रष्टाचार यांच्या विषयीच्या कल्पना संशोधनाबाबतच्या गैरसमजुतीतून निर्माण होतात. संशोधन यशस्वी होण्यासाठी, म्हणजेच त्याला मान्यता मिळण्यासाठी, शास्त्रज्ञाला सहकार्य व स्पर्धा या दोन्हींचा अवलंब करावा लागतो. जे.बी.एस. हाल्डेन याने एकदा म्हटले होते की, माझ्या संशोधनाचे मला श्रेय न मिळाले तरी चालेल; मी काढलेल्या संकल्पना इतर शास्त्रज्ञांनी वापरल्या हे पाहण्याचे समाधान मला महत्त्वाचे वाटते. हाल्डेन मुळातच मान्यताप्राप्त व उदारमताचा शास्त्रज्ञ होता व हे म्हणणे त्याला शोभून दिसले. पण 'हे संशोधन अमक्याचे आहे' असा गौरव होणे हे बहुतेक शास्त्रज्ञांना हवेसे वाटते.

शास्त्रज्ञांनी दुसऱ्यांचे संशोधन चोरल्याचे किंवा एका विशिष्ट सिद्धांताला ज्यामुळे पाठिंबा मिळेल असे खोटे शोध लावल्याचे बरेच किस्से विज्ञानाच्या इतिहासात आढळून येतात. काही वेळा असेही झाले आहे की, नामवंत शास्त्रज्ञही अशा अप्रामाणिक व अनैतिक व्यवहारात सापडले होते. बरेचदा असेही होते की, विख्यात शास्त्रज्ञ आपल्या हाताखाली काम करणाऱ्या संशोधकाच्या शोधनिबंधाला आपले नाव लावण्याला मान्यता देतो व मागून तो निबंध चोरला असल्याचे किंवा ते संशोधन खोटे असल्याचे निष्पन्न होते आणि त्याचा काळिमा त्या विख्यात शास्त्रज्ञाला लागतो. हा परिणाम त्या शास्त्रज्ञाच्या गहाळपणामुेही उद्भवतो. असे भ्रष्टाचार निंदनीयच असले तरी त्यामुळे विज्ञानाचा सर्वच व्यापार संशयास्पद ठरते असे म्हणणे बरोबर होणार नाही. एकतर अशा भ्रष्टाचारी घटना, विज्ञानाचा इतिहास पाहता तुरळक आहेत. दुसरे असे की, विज्ञानात घडलेला खोटेपणा उघडकीला आल्याखेरीज राहत नाही. इतर क्षेत्रातील खोटेपणा पचून जाण्याची शक्यता असते. काही प्रकारचा अप्रामाणिकपणा अधिक सूक्ष्म असतो. पुष्कळदा शास्त्रज्ञ मनाशी एक सिद्धांत ठरवतात व प्रयोगाची निरीक्षणे त्या सिद्धांताला पुष्टीदायक होतील असा रीतीने रंगवतात. मोठमोठ्या शास्त्रज्ञांवर उदा. मेण्डेल व मिलिकन - असे आरोप झाले आहेत व त्यात तथ्य नव्हते असे नाही.

विज्ञानाला एकाच शाखेत व त्या शाखेतही एकाच विषयात संशोधन करणाऱ्या शास्त्रज्ञांत आधी कोण नवा शोध लावतो व प्रसिद्ध करतो याची चुरस लागलेली असते व बऱ्याच शास्त्रज्ञांचा असा अनुभव आहे की, आपल्याला केव्हाना केव्हा हार पत्करावी लागली आहे. त्यामुळे आपण नेमका कोणता विषय संशोधनासाठी निवडायचा याचा निर्णय संशोधकाने चातुर्याने करावा लागतो. याबद्दल एक नियम असा आहे, की तुमच्या आवडीचा विषय आठवला की, इतर सारे सोडून त्याच्या पाठी लागा. बार्बारा मॅक्लिनटॉक नावाची एक संशोधक होती. तिने बऱ्यापैकी नाव कमावले होते. वयाच्या बेचाळीसाव्या वर्षी तिचे लक्ष्य मक्या (मेझ) च्या दाण्यातील पेशींकडे गेले. तिला असे आढळले की पेशींना वेगवेगळे रंग आले असून त्यामुळे मक्याच्या दाण्यात रंगीबेरंगी डाग पडले आहेत. त्यानंतर काय झाले याविषयी तिने लिहिले आहे, 'पेशींचे विभाजन होताना असे काही घडून आले असले पाहिजे की त्यामुळे हे पंगीबेरंगी डाग उमटले असावेत. या डागांनी माझे लक्ष इतके वेधून घेतले की, मी इतर व्यवधाने सोडून दिली

व या डागांची कारणे शोधण्याच्या मागे लागले. मला वाटले की, ही कारणे मी शोधून काढू शकेन.' १९५० साली तिने एका चर्चासत्रात या विषयावरचा आपला निबंध वाचला तेव्हा तिच्या संशोधनाचे अगदी थंडे स्वागत झाले. तिची प्रमुख कल्पना अशी होती, की रंगसूत्राचे (क्रोमोसोम) तुकडे ज्या संरचनेत आढळायचे त्यापेक्षा निराळ्या, उलटापालट करून बनलेल्या ट्रान्सपोन्ड संरचनेत (पॅटर्न) आढळून येऊ शकतात. हा विचार त्यावेळी जो पक्का ठरलेला विचार होता त्याच्याशी सुसंगत नव्हता. त्यावेळच्या समजुतीप्रमाणे रंगसूत्रातील जनुके (जीन्स) ठरीव क्रमानेच असायला हवीत. मॅक्लिटॉन्क हिचा अभ्युपगम (हायपॉथेसिस) काही जीवशास्त्रज्ञांनी स्वीकारून त्यानुसार संशोधन केले व मगच त्या अभ्युपगमाचे महत्त्व लोकांच्या ध्यानी आले. १९६० साली शास्त्रज्ञांनी जंतूंच्या (बॅक्टेरिया) रंगसूत्रातील जनुकेही अदलाबदलीने आढळून येतात असे निरीक्षण केले. त्यामुळे मॉक्लिनटॉकचा अभ्युपगम मान्यता पावला व तिला नोबेल पारितोषिकही मिळाले.

वेगेनेट नावाच्या भूशास्त्रज्ञाने पृथ्वीच्या पाठीवरील खंड घरंगळत असतात, असा सिद्धांत मांडला. आफ्रिका व दक्षिण अमेरिका ही खंडे एकेकाळी एकत्र जुळलेली होती व कोट्यवधी वर्षात ती एकमेकांपासून फुटून घरंगळत (ड्रिफ्ट) दूर गेली, असा कयास त्याने विसाव्या शतकाच्या तिसऱ्या दशकात मांडला, तेव्हा त्याच्या ह्या कयासाचा कडाडून विरोध झाला. विरोधकांचे म्हणणे असे की, हा कयास स्वीकारायचा तर भूशास्त्रीय अनेक संकल्पना उडवून लावाव्या लागतील, हे एक; व दुसरे म्हणजे ही खंडे अशी घरंगळत असतील तर त्या घरंगळण्याचे कारण काय? वेगवेगळ्या कयासाला पाठिंबा मिळेल असा पुरावा, भौतिकीच्या अभ्यासकांनी १९६० नंतर शोधून काढला. पृथ्वीच्या चुंबकीय क्षेत्रात फेरबदल होतात, असे आढळून आले व त्यातून परोक्षरित्या खंडांच्या घरंगळण्याचा पुरावा मिळाला. त्याच्या उलट गोष्ट कोल्व्हिन नावाच्या विख्यात शास्त्रज्ञाच्या बाबतीत घडली. १९ व्या शतकाच्या अखेरीला एक भौतिकी-शास्त्रज्ञ म्हणून केल्व्हिनचा मोठा दबदबा होता. बायबलमध्ये म्हटले आहे की, इसपू ४००० च्या सुमारास पृथ्वीचा जन्म झाला. १९ व्या शतकाच्या अखेरीस शास्त्रज्ञ अशा विचाराला पोचले होते की, पृथ्वी कोट्यवधी वर्षांपूर्वी सूर्यापासून निराळी झाली असावी. कोल्व्हिनचे म्हणणे असे होते की, धगधगत्या पृथ्वीला थंड होण्यासाठी इतका दीर्घकाळ लागला नसणार. पृथ्वीचे वय काही लाख वर्षांत मोजता येईल. तथापि पुढे शास्त्रज्ञांनी असे दाखवून दिले की, धगधगत्या पृथ्वीची उष्णता किरणोत्सर्जना-मुळे (रेडिओ ॲक्टिव्हिटी) निर्माण झाली असल्याने ती थंड होण्यास काही लाख नव्हे तर काही कोटी वर्षे लागतील. या उदाहरणांवरून व इतरही पाहण्यांवरून असे दिसून येते की, जुन्या संकल्पना टाकून नवीन संकल्पना स्वीकारण्यास शास्त्रज्ञ नाराज असतात. जुन्या सिद्धांतांचा व शिक्षणाचा पगडा शास्त्रज्ञांवर घट्ट पडलेला असतो. शास्त्रज्ञ निराग्रही व निराभिनिवेश असतात, ही चुकीची समजूत आहे. सामान्य माणसाला असणारे पूर्वग्रह, रागलोभादि विकार त्यांच्या ठिकाणीही असतातच.

शास्त्रज्ञ जेव्हा नवीन कल्पना, सिद्धांत मांडतो तेव्हा त्याचे समकालीन शास्त्रज्ञ त्या सिद्धांताला मान्यता देतात का व ती कोणत्या निकषावर देतात? मॅक्स प्लँक हा मान्यवर शास्त्रज्ञ होऊन गेला. तो सांगत असे की, 'नव्या सिद्धांताला मान्यता मिळते ती विरोधकांच्या विचारात बदल झाल्यामुळे नव्हे तर कालक्रमाने विरोधक मरून गेल्याने मिळते. जी नवीन पिढी संशोधनाच्या क्षेत्रात उतरते तिला हा, एकेकाळी नवा असलेला सिद्धांत चांगलाच माहीत झालेला असल्याने त्यांचा कल नव्या सिद्धांताच्या स्वीकाराकडेच असतो. अशी समजूत आहे की शास्त्रज्ञ म्हातारे होत जातात तसा नव्या सिद्धांतांना असणारा त्यांचा विरोध वाढत जातो. परंतु हा विरोध वयोमानावर अवलंबून असतो असे नाही. ज्या मान्य सिद्धांताच्या संगतीत आपण वाढलो व संशोधन केले त्या सिद्धांताला बाधक असा नवा सिद्धांत कोणी मांडला तर त्याला इतर शास्त्रज्ञ मग ते म्हातारे असोत की तरुण, सहजी [illegible]ता देणार नाहीत हे साहजिक आहे. नवीन सिद्धांत चुकीचा असण्याची शक्यता कायमच असते. तेव्हा असा सिद्धांत स्वीकारून त्याच्या छायेत संशोधन करण्यात काल, शक्ती व पैसा खर्च करणे ही जोखमीची गोष्ट असते. चालू किंवा प्रस्थापित सिद्धांतात काही त्रुटी जरूर आढळतात. पण नवीन सिद्धांत जुन्यापेक्षा निश्चितपणे अधिक किफायतशीर आहे याची खात्री पटल्याखेरीज जुन्या सिद्धांताचा त्याग करण्यास शास्त्रज्ञ तयार होत नाहीत.

काही विचारवंत असे मानतात की, दोन सिद्धांतांची आपण तुलनाच करू शकत नाही, व त्यामुळे एकापेक्षा दुसरा अधिक उपयोगाचा आहे, असे ठरविता येत नाही. थोडक्यात म्हणजे एकाच प्रकारच्या नैसर्गिक घटनांचा

उलगडा करण्याचा दावा करणारे दोन सिद्धांत, समजा की क आणि ब हे अतुलनीय (इन्कॉमेन्शुरेबल) असतात. विज्ञानाचा इतिहासकार थॉमस कुन्ह याचे हे प्रसिद्ध मत आहे. तो म्हणतो की, आइनस्टाइनचे गतिशास्त्र (मेकॅनिक्स) व न्यूटनचे गतिशास्त्र यांची तुलनाच होऊ शकत नाही; कारण हे दोन सिद्धांत ज्या संकल्पनांचा उपयोग करतात त्या इतक्या भिन्न आहेत, की या दोन सिद्धांतांची मांडणी, त्यांची परस्परांशी तुलना करता येईल अशा शब्दात होऊच शकत नाही. परंतु बहुतेक भौतिकी-शास्त्रज्ञांचा कुन्हच्या या युक्तिवादाला विरोध आहे. ते म्हणतात की, न्यूटनचे गतिशास्त्र ही आइनस्टाईनच्या गतिशास्त्राचीच एक उपशाखा आहे. पण हे उदाहरण सोडले तरी, हे भौतिकीशास्त्रज्ञ सांगतात, कोणतेही दोन परस्परविरोधी सिद्धांत पुढे आल्यास त्यातील बरोबर कोणता हे ठरविण्यासाठी कोणता ना कोणता कळीचा प्रयोग आपण योजून परीक्षा करु शकतो.

विज्ञानाचे कार्य व प्रगती कशी चालते याविषयी कुन्हने जे विवेचन केले आहे ते सिद्धांतांच्या अतुलनीयतेवर अवलंबून आहे. कुन्हचे प्रतिपादन खालीलप्रमाणे सांगता येईल. आपण विज्ञानाची एक विशिष्ट शाखा घेऊ. उदा० खगोलशास्त्र व त्यातील ग्रहमाला याविषयी अतिप्राचीन सिद्धांत होता, की पृथ्वी ग्रहमालेच्या मध्यावर आहे. हा सिद्धांत गृहीत धरुन टॉलेमी वगैरे खगोलशास्त्रज्ञांनी ग्रहांच्या गती व कक्षा ठरविणारी गणिते बसविली; वेध घेतले; ग्रहांची दृश्यस्थाने व गणिताने काढलेली स्थाने यात तफावत पडली तर तिचा खुलासा केला. इ. अशा रीतीने प्रस्थापित सिद्धांत स्वीकारुन त्याचे उपसिद्धांत विगमनाने सिद्ध करीत जेव्हा विज्ञान वाढते तेव्हा विज्ञानाच्या त्या प्रगतीला कुन्ह परिपाठीय प्रगती (नॉर्मल सायन्स) असे नाव देतो. ज्या प्रस्थापित सिद्धांताच्या व त्याच्याशी जडलेल्या समजुतींच्या छायेत परिपाठीय प्रगती होते त्या सामग्रीला तो रुपसरणी (पॅरेडाईम) असे संबोधितो. पण या मूळ सिद्धांताला मूलतःच विरोधी असा सूर्यकेंद्री सिद्धांत कोपर्निकसने मांडला व तो सिद्धांत आणि त्याच्याशी निगडित अशा समजुतींची नवी 'रुपसरणी' पुढे आली. १६ व्या शतकापासूनचे खगोलशास्त्र या नव्या विचारसरणीच्या छायेत विकसित झाले. कुन्हचे प्रतिपादन असे की, पृथ्वीकेंद्री खगोलशास्त्राकडून सूर्यकेंद्री खगोलशास्त्रावर जी उडी मारली गेली त्यामुळे क्रांतिकारक बदल घडून आला. पृथ्वीकेंद्री खगोलशास्त्र व सूर्यकेंद्री खगोलशास्त्र यांची तुलनाच होऊ शकत नाही. कारण दोन्हीच्या रुपसरणीच भिन्न आहेत. खगोलशास्त्रातील हे उदाहरण ज्याला धडधडीत रुपसरणी-परिवर्तन म्हणता येईल अशा प्रकारचे आहे. पण रुपसरणीतील फरक अधिक सूक्ष्म असला तरीही 'रुपसरणी-परिवर्तन' क्रांतिकारी बनू शकते. उदाहरणार्थ न्यूटनचे गतिशास्त्र व आईनस्टाईनचे गतिशास्त्र यांच्या रुपसरणी घ्या. न्यूटनच्या गतिशास्त्राप्रमाणे वस्तुमान (मास) व वेग (व्हेलॉसिटी) या गोष्टी परस्परांपासून स्वतंत्र आहेत. आइनस्टाइनचे गतिशास्त्र असे मानते की, वेग बदलला तर वस्तुमानही बदलते. डार्विनच्या आधीचे जीवशास्त्र असे धरुन चालत होते की, प्राण्यांच्या जाती (स्पेसीज्) पक्क्या ठरलेल्या आहेत. डार्विनने जीवशास्त्रात नवी रुपसरणी आखली. या रुपसरणीतील उत्क्रांतीचा सिद्धांत असे मानतो की प्राण्यांच्या जाती कायमच्या ठरलेल्या नाहीत. जाती उत्क्रांत होऊन पहिल्यापेक्षा निराळ्या बनतात व काही जाती तर नाहीशा देखील होतात. आण्विक जीवशास्त्रात, अलीकडच्या काळात असेच रुपसरणी परिवर्तन घडून आले. पूर्वी संशोधनाचे केंद्र झालेला प्रश्न होता की, प्राण्यांच्या शरीरातील प्रथिने तयार होण्यासाठी लागणारी ऊर्जा कोठून मिळते. आधुनिक आण्विक जीवशास्त्र सांगते की, ऊर्जेचा प्रश्न महत्त्वाचा नाही; एका प्रथिनातील ॲमिनो ॲसिडस् ची क्रमवारी कोणत्या माहितीनुसार (इन्फॉर्मेशन) ठरते, हा प्रश्न अधिक महत्त्वाचा आहे. (आमच्या पहिल्या लेखांकात याचे विवेचन आहे.)

एका रुपसरणीवरुन दुसऱ्या रुपसरणीवर उडी मारण्याची वेळ वैज्ञानिकांच्या समूहावर कशामुळे येते? कुन्ह सांगतो की, जी स्वीकृत रुपसरणी असते तिच्या परिघात राहून प्रश्न सोडविताना काही प्रश्न असे आढळतात की त्यांची सोडवणूक त्या रुपसरणीच्या कुवतीच्या बाहेर आहे, असे शास्त्रज्ञांना वाटू लागते. उदा - पृथ्वीकेंद्री ग्रहमाला या रुपसरणीला धरुन गणिते मांडताना असे आढळून आले की ग्रहणांबद्दलच्या कित्येक आटकळी चुकीच्या ठरत आहेत. आकडेमोडीतून ठरणारी ग्रहांची स्थाने व वेधातून मिळालेली स्थाने यात तफावत आहे. अर्थात प्रत्येक रुपसरणीच्या बाबतीत या अडचणी येतातच. पृथ्वीकेंद्री ग्रहमालेचा सिद्धांत सोडून देऊन सूर्यकेंद्री ग्रहमालेची रुपसरणी स्वीकारल्या-नंतरही चुका होतच होत्या. परंतु, नवीन सूर्यकेंद्री रुपसरणी स्वीकारल्यानंतर ज्या चुका होत होत्या त्या टाळण्याचे नवीन

उपायही सापडत गेले. उदा. वर्तुळाकार कक्षेचा आग्रह सोडून लंबवर्तुळाकार कक्षांचा स्वीकार केला गेला. त्यामुळे काही चुकांवर मात करता आली. तेव्हा रूपसरण्यंतर (शिफ्ट ऑफ पॅराडाईम) होण्यांचे एक कारण असे की, पहिली रूपसरणी मर्यादित वाटू लागते; तिच्या योगाने ज्या समस्या सुटत नाहीत अशा समस्यांची चळत वाढत जाते व पहिल्या रूपसरणीच्या छायेत राहून परिपाठीय प्रगती कामात रमलेला जो शास्त्रज्ञसंघ असतो तो अशा निष्कर्षाप्रत येऊन पोचतो की, मूळ रूपसरणीचा समूळ त्याग केला पाहिजे.

जेव्हा शास्त्रज्ञांचा संघ रूपसरणी 'क' टाकून देऊन 'रूपसरणी ख' चा अवलंब करण्याचे ठरवतो तेव्हा जे रूपसरणी-परिवर्तन होते ते प्रगतीपर असते, की प्रगतिविन्मुख असते, हे ठरविण्याचे निकष कोणते? कुन्हचे म्हणणे असे की, दोन रूपसरणींची तुलनाच होऊ शकत नाही. आपण असे म्हणू शकत नाही की, रूपसरणी क टाकून देऊन रूपसरणी ख स्वीकारताना शास्त्रज्ञ असे ठामपणे ठरवितात की (१) 'क'च्या सहाय्याने ज्या घटनांचे खुलासे मिळतात त्या सर्व घटनांचे खुलासे 'ख'च्या सहाय्यानेही मिळतात, आणि (२) अशा काही घटना आहेत की ज्यांचा उलगडा 'क' करू शकत नाही पण 'ख' ही रूपसरणी करू शकते. त्यामुळे 'क' पासून 'ख' कडे होणाऱ्या परिवर्तनांचे समर्थन आपल्याला केवळ विवेकाच्या आधाराने करता येणार नाही. त्यासाठी परिवर्तनाचा निर्णय करणाऱ्या शास्त्रज्ञ समूहाच्या समाजशास्त्राचा अभ्यास करावा लागेल. आपण पाहिलेच आहे की, शास्त्रज्ञ हे प्रस्थापित विचारसरणी सोडून नवीन विचारांचा अंगीकार करण्यास सहसा तयार नसतात. मग रूपसरणीतील हे परिवर्तन का घडून येते? आपण मागे पाहिले आहे की, वेगेनेदने मांडलेला खंडांच्या घरंगळण्याचा सिद्धांत कालांतराने त्याविषयीचा पुरावा हाती आल्यावर शास्त्रज्ञांनी स्वीकारला. रूपसरणी-परिवर्तनाच्या बाबतीतही असे घडून येत असेल.

विज्ञानाच्या इतिहासात असे अनेक प्रसंग दिसतात की जिथे कुन्हच्या प्रतिपादनाच्या विरुद्ध घडामोड झालेली दिसते. म्हणजे अमुक एक घटना रूपसरणीकडून उलगडली जात नाही, ही गोष्ट नवीन रूपसरणीचा उदय झाल्यावरच ध्यानात आली. होते असे की, प्रचलित रूपसरणीचा प्रभाव इतका गडद असतो की तिच्याने न उलगडली जाणारी घटना दुर्लक्षिलेली राहते. नवीन रूपसरणीचा स्वीकार केल्यावर ही आजवर कोपऱ्यात पडलेली लहान घटना निराळ्याच महत्त्वाने चमकू लागते व त्या घटनेचा उपयोग नवीन रूपसरणीचे यश सांगायला होतो. उदा. एके काळी अशी रूपसरणी होती की, ईश्वराने विविध प्राणिजाती (स्पेसिज्) एकदाच व कायमच्या बनवून टाकल्या आहेत व त्या प्रत्येक जातीने आपल्या परिसराशी पूर्णपणे जुळवून घेतले आहे. पण ही समजूत सर्वच प्राण्यांचा बाबतीत लागू पडणारी नव्हती. काही बदकांना पंख्यासारखी पावले होती; पण ती कधी पोहत नसत. तसेच कित्येक प्राणी आंधळे व बिळात राहणारे असूनही त्यांना डोळे मात्र होते. पुढे डार्विनने उत्क्रांतीची नवी रूपसरणी मांडल्यावर मागील रूपसरणीने ज्यांचा खुलासा होत नव्हता अशी वर सांगितलेली उदाहरणे महत्त्व पावली व उत्क्रांतिवादाने त्यांचा उलगडा होत असल्याने त्या उदाहरणांचा उल्लेख उत्क्रांतिवादाच्या यशाची गमके म्हणून होऊ लागला.

कार्ल पॉपर हा विज्ञानाचे तत्त्वज्ञान सांगणारा नामवंत पंडित होता. तो सांगत असे की, विज्ञानातील सिद्धांत निर्विवाद सिद्ध झाले आहेत, असे कधी होत नाही. मात्र एखादा जरी नमुना त्या सिद्धांताच्या विरोधात जाणारा आढळला तरी तो सिद्धांत निश्चितपणे खोटा ठरतो. थोडक्यात म्हणजे विज्ञानाची प्रगती कशी होते, तर भरमसाठ अंदाज करावा व तो खोटा पाडणारे उदाहरण शोधावे यातून. पण खरोखरच शास्त्रज्ञ या पद्धतीने संशोधन करतात का? ते आपले शहाजोगपणे म्हणतात की, 'अंदाज वर्तवणे व तो खोटा ठरणे' यातून अधिक चांगले अंदाज पुढे येतात. पण अंदाज व तो खोटा ठरविणे इतक्या सोप्या रीतीने विज्ञानाची वाटचाल होत नाही. इतिहासात असे अनेकदा झाले आहे की सिद्धांताला खोटा ठरवणारा पुरावा शास्त्रज्ञांनी जाणूनबुजून दुर्लक्षिला होता. कोपर्निकसने सूर्यकेंद्री ग्रहमालेची कल्पना मांडली. पण या कल्पनेच्या चौकटीत एक घटना बसत नव्हती; ती म्हणजे शुक्राला लागणाऱ्या कला. कोपर्निकस व त्याच्या नंतरचे खगोलशास्त्रज्ञ यांना ही गोष्ट माहिती होती. पण हा विरोधी पुरावा त्यांनी दडवून ठेवला व ते सूर्यकेंद्री-ग्रहमालेच्या सिद्धांताला चिकटून राहिले. पुढे ५० वर्षांनी गॅलिलिओने शुक्राला लागणाऱ्या कलांचा खुलासा केला. पण हा खुलासा दिल्यावर, कोपर्निकसने याविरोधी पुराव्याचा बाऊ करून आपला सिद्धांत सोडला नाही याची गॅलिलिओने स्तुतीच केली.

विरोधी पुराव्याकडे दुर्लक्ष करायचे, असा डाव शास्त्रज्ञांनी अनेकदा खेळला आहे. त्याचे एक उदाहरण असे.

संगमरवराच्या दोन गुळगुळीत चकत्या घेतल्या व त्या एकमेकींवर दाबल्या तर त्या चकत्या घट्ट चिकटतात. रॉबर्ट बॉईल या विख्यात शास्त्रज्ञाने असा कयास बांधला की हवेच्या दाबामुळे त्या चकत्या चिकटतात व जर निर्वात प्रदेशात अशा चिकटलेल्या चकत्या ठेवल्या तर त्या सुट्या होतील. त्याने त्यानुसार अनेक प्रयोग केले पण ते सारे फोल गेले. खरे म्हणजे, पॉपरचा पद्धतिशास्त्रीय नियम पाळायचा म्हटले तर त्याने आपला कयास - चकत्या हवेच्या दाबामुळे चिकटतात - सोडून द्यायला हवा होता. पण बॉईलने धीर सोडला नाही. तो म्हणू लागला की, ज्या निर्वात भांड्यास चिकटलेल्या चकत्या ठेवल्या, ते भांडे पुरेसे निर्वात झालेलेच नव्हते. त्याने भांडे निर्वात करणाऱ्या पंपात पुनःपुन: सुधारणा केल्या व अखेर ५० व्या खेपेला त्याला यश आले.

सन १९१० च्या सुमारास शिकागोमधील प्रा. रॉबर्ट मिलिकन व व्हिएन्नातील प्रा. एहरेनहाफ्ट यांच्यात वाद झाला. वादाचा विषय होता की, निसर्गात सापडणारा लहानात लहान विद्युतभार म्हणजे, हल्लीच्या भाषेत एका इलेक्ट्रॉनवरील विद्युतभार - केवढा असतो. मिलिकनचे म्हणणे होते की, या विद्युतभाराची किंमत ही एक मूलभूत महत्त्वाची संख्या असेल. सूर्यप्रकाशाच्या वेगाचा आकडा ही अशीच एक मूलभूत महत्त्वाची संख्या आहे. हा आकडा काढण्याचे बरेच मार्ग होते; पण मिलिकनची इच्छा इलेक्ट्रॉनवरील विद्युतभार प्रत्यक्ष मोजावा अशी. एहरेनहाफ्टने हा विद्युतभार मोजला होता असे एहरेनहाफ्टचे म्हणणे होते. पण हा आकडा अपेक्षेपेक्षा फार लहान वाटतो अशी मिलिकनची तक्रार होती.

यासाठी मिलिकनने जो प्रयोग केला त्याची मुख्य कल्पना होती की, तेलाच्या थेंबावर बसलेला इलेक्ट्रॉन पकडायचा व त्याचा विद्युतभार तपासायचा. यासाठी त्याने एक उपकरण तयार केले. उपकरणाच्या सहाय्याने मिलिकनने एका इलेक्ट्रॉनवरील विद्युतभार मोजला. तो $४.६५ \times १०^{-१०}$ इतके स्थिरविद्युत एकक (इलेक्ट्रोस्टॅटिक युनिटस्) एवढा भरला. एहरेनहॅफ्टने अशा तऱ्हेने विद्युतभार प्रत्यक्ष रीतीने मोजला नव्हता तर फॅरॅडेने विद्युत-विश्लेषणाविषयी (इलेक्ट्रोलायसिस) जे संशोधन केले होते त्यावरून आकडेमोडीने व तर्काने काढला होता.

मिलिकनने आपला प्रयोग ३८ वेळा करून विद्युत-भारांची निरीक्षणे केली होती. या निरीक्षणांचे त्याने सात गट करून प्रत्येक गटाला एकापासून सातापर्यंत गुण दिले होते. हे गुण त्याने कशाच्या आधारावर दिले? मिलिकनने प्रयोगा-पूर्वीच अपेक्षित विद्युतभार किती असला पाहिजे हे ठरवले होते. आणि त्याने ही खूणगाठही बांधली होती हा विद्युतभार एक व एकच आला पाहिजे. त्यामुळे अपेक्षित आकड्याच्या जवळपास न येणारी जी निरीक्षणे होती ती मिलिकनने बाद ठरविली आणि अपेक्षित आकडा देणारी निरीक्षणे स्वीकारली. सांगण्याचा हेतू असा की, बाद ठरविलेल्या निरीक्षणांच्या पुराव्यावर विसंबून त्याने मनाशी ठरविलेली अटकळ झिडकारून टाकली नाही. पॉपरचे तत्त्व मानायचे तर मिलिकनने आपला अभ्युपगम (हायपोथोसेस) केव्हाच टाकून द्यायला हवा होता. अखेर मिलिकनने ठरविलेला किमान विद्युतभारच प्रमाण मानला गेला व मिलिकनला नोबेल पारितोषक मिळाले.

मिलिकनने केलेल्या प्रयोगाचा इतिहास सांगून जिराल्ड होल्टन हा विचारवंत सांगतो की, शास्त्रज्ञाच्या ठिकाणी अविश्वासाला आवर घालण्याची शक्ती हवी. असा कोणताच वैज्ञानिक सिद्धांत असत नाही की ज्याच्या सहाय्याने त्या सिद्धांताच्या क्षेत्रातील सर्व घटनांचा उलगडा होऊ शकेल. काही ना काही घटना अशा निघणारच की ज्या त्या सिद्धांताच्या विरोधात जातात. चाणाक्ष शास्त्रज्ञ अशा घटनांकडे दुर्लक्ष करतो. तो मानतो की, या घटनाच चुकीच्या पद्धतीने मांडल्या आहेत. याबद्दल एक किस्सा आहे. इंग्लंडचा राजा चार्लस् (दुसरा) याच्या कारकीर्दीत 'रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स' या संस्थेची स्थापना झाली. या संस्थेचे सभासदत्व नामवंत शास्त्रज्ञांना बहाल करण्यात येते. या चार्लस्ने एक दिवस अशा सर्व शास्त्रज्ञांना बोलावले आणि विचारले की, मासा जिवंत असताना त्याचे जे वजन असते त्याच्यापेक्षा तो मेल्यावर त्याचे वजन जास्त भरते, ते का? शास्त्रज्ञांनी आपापल्या परीने या प्रश्नाची डोकेबाज उत्तरे दिली. अखेर राजाने सांगितले की, मासा जिवंत असतानाचे वजन व तो मेल्यानंतर केलेले वजन ही सारखीच असतात. तेव्हा आपण ज्याला 'सत्य निरीक्षण' म्हणतो ते बरोबर असते ना, याचे भान शास्त्रज्ञाला ठेवावे लागते.

'अविश्वासाला आवर घाला' हा होल्टनचा इशारा जिथे उपयोगी ठरला, अशी बरीच उदाहरणे आहेत. डेनिस बर्किट नावाचा एक डॉक्टर आफ्रिकेत वैद्यकी करीत असे. आफ्रिकेच्या विषुववृत्तीय भागातील लहान मुलात एक प्रकारचा अर्बुदाचा (ट्यूमर) आजार आढळून येई. बर्किटचे





म्हणणे असे होते की पाऊस व उष्णतामान यांचा या आजाराशी संबंध आहे. या विषयावर बर्किटने लंडनमध्ये एक व्याख्यान दिले. ते व्याख्यान ऐकणाऱ्यात एपस्टीन नावाचा विषाणुशास्त्रज्ञ (व्हायरॉलॉजिस्ट) होता. त्याने ताबडतोब कयास बांधला की, हा आजार विषाणूंमुळेच होत असणार. एपस्टीनने इतर उद्योग सोडले व तो या आजाराच्या पाठीस लागला. आफ्रिकेतून अर्बुदांचे तुकडे विमानातून लंडनला आणत व एपस्टीन आणि त्याचे सहकारी त्यातील विषाणूंचा शोध घेत. परंतु त्यांना विषाणू काही आढळले नाहीत. तरी त्यांनी प्रयत्न सोडले नाहीत. विषाणूंखेरीज अर्बुद होणारच नाही, शोध चालू ठेवला पाहिजे असे एपस्टीन स्वतःला बजावीत असे. अखेर, हिवाळ्यातील एका दिवशी, आफ्रिकेतून अर्बुदाचे नमुने आले. त्यांच्यावर बुरशी धरली असावी असे भासत होते. एपस्टीनने सूक्ष्मदर्शकयंत्राखाली ते नमुने तपासले तेव्हा त्याला आढळले की, नमुन्यांवर बुरशी धरलेली नसून अर्बुदाच्या पेशी विलग झाल्या होत्या. त्याला आढळले की, अमेरिकन शास्त्रज्ञांच्या एका गटाने अर्बुदाचा गोळा संवर्धित (कल्चर) करण्याऐवजी त्याच्या पेशी निराळ्या करून त्यांचे संवर्धन करण्याचा प्रयोग केला होता. एपस्टीननेही अर्बुदाच्या पेशी वेगळ्या करून त्या वाढवल्या. त्यातून ज्या विषाणूंमुळे अर्बुदे होत होती त्यांचा शोध लागला. त्या विषाणूला एपस्टीन-बार-विषाणू असे नाव मिळाले.

आपण मागे पाहिलेच आहे की, पॉपरच्या मताप्रमाणे सिद्धांत निरपवादपणे सत्य आहे असे ठरविण्याची युक्ती कोणतीच नाही; मात्र सिद्धांत खोटा ठरवायला सिद्धांताच्या विरोधी जाणारा एखादा पुरावाही पुरे होतो. त्यामुळे पॉपरचा असा आग्रह होता की, वैज्ञानिक उपपत्तीने असे स्पष्ट सांगितले पाहिजे की, कोणत्या प्रकारचा पुरावा आणला असता आपण खोटे ठरू. यासाठी तो आईन-स्टाईनच्या सापेक्षतेच्या व्यापक उपपत्तीचे (जनरल थिअरी ऑफ रिलेटिव्हिटी) उदाहरण देत असे. या उपपत्तीपासून निघणारा एक निष्कर्ष असा आहे की, रंगपटरेषांचे गुरुत्वाकर्षणामुळे स्थानांतरण झाले पाहिजे. (ग्रॅव्हिटेशनल शिफ्ट ऑफ स्पेक्ट्रल लाईन्स) हा निष्कर्ष खोटा ठरला तर आपण सापेक्षतेची व्यापक उपपत्ती सोडून देऊ असे आईनस्टाईन सांगे. गंमत अशी की, आईनस्टाईन हयात होता तोपर्यंत तरी रंगपटरेषांचे स्थानांतरण काही आढळून आले नाही. तथापि त्यामुळे आईनस्टाईन विचलित झाला नाही. त्याला खात्री होती की, आपली उपपत्ती बरोबरच आहे. आईनस्टाईनचे दुसरे भाकित होते की गुरुत्वाकर्षणामुळे प्रकाश-किरण वाकतात. १९१९ साली प्रख्यात खगोलशास्त्रज्ञ आर्थर एडिंग्टन याला एका ग्रहणाची पाहणी करताना प्रकाशकिरण वाकत असल्याचे आढळले. हा प्रत्यय आल्यामुळे आईनस्टाईनच्या उपपत्तीला अमाप प्रसिद्धी मिळाली. तथापि, आईनस्टाईन त्यामुळे हुरळला नाही. तो म्हणाला, असा प्रत्यय आला नसता तरी माझी उपपत्ती खरी आहे हा माझा विश्वास ढळला नसता. तेव्हा एडिंग्टनच्या निरीक्षणाचा फायदा म्हणजे आईनस्टाईच्या सिद्धांताला लाभलेली प्रसिद्धी.

अर्थात अशी प्रसिद्धी मिळणे ही देखील कमी महत्त्वाची गोष्ट नाही. कारण त्यामुळे त्या उपपत्तीचा अभ्यास फैलावतो, त्या उपपत्तीत गुंफलेल्या संकल्पना विसरल्या गेल्या असे होत नाही. विज्ञानाचा एक भाग म्हणजे मांडलेल्या सिद्धांताला मान्यता मिळणे. ही मान्यता या प्रसिद्धीमुळे मिळते. विज्ञानाच्या विकासाला एक समाजशास्त्रीय अंग आहे, हे या प्रसिद्धीच्या महत्त्वावरुन ध्यानी येते.

इतिहासात घडलेल्या हकीकतींकडे दोन दृष्टिकोनांतून पाहता येते. एक दृष्टिकोन असा की, हे प्रसंग असंबद्ध व फुटकळ आहेत. त्यातून घटनाक्रम व घटनाक्रमाची दिशा ठरवणे व्यर्थ आहे. उलट जो दृष्टिकोन मांडला जातो तो हा की, इतिहासात सतत प्रगती होत आली आहे. क्वचित कोठे परागती दाखवणारे प्रसंग घडले असतील तर तिकडे दुर्लक्ष करावे. इतिहासाचा मुख्य प्रवाह प्रगतीच्या दिशेने वाहतो आहे. विज्ञानाचे इतिहासकार मानतात की, विज्ञानाच्या बाबतीत पहिलाच दृष्टिकोन बरोबर आहे. वैज्ञानिक उपपत्ती अतुलनीय असल्याने प्रगतीचा निकषच मुळी उपलब्ध नाही. पण हा विचार बरोबर नाही, असे वोल्पर्ट सांगतात. विज्ञानात चुका होतात, शास्त्रज्ञ ठेचकाळतात पण व्यापक दीर्घकालीन परिप्रेक्ष्यातून पाहिले तर असे पटते की विज्ञानाची प्रगतीच होत आहे. आपले विज्ञान सत्याच्या अधिकाधिक जवळ पोचत आहे. हे शक्य आहे की, पूर्ण व निरपवाद सत्य हाती लागणारही नाही. पण जास्तीतजास्त जवळ पोचणे ही उपलब्धी अज्ञात आणि आभास यांच्या पेक्षा शतपटीने महत्त्वाची आहे.












# उत्तर-नव भारत : सुसंवादासाठी

## शतकानंतरच्या वळणावर

भास्कर लक्ष्मण भोळे, किशोर बेडकिहाळ

(ग्रंथातून प्रकाशकांच्या सौजन्याने)

१

विचारवेध संमेलनाचा उपक्रम डॉ० बाबासाहेब आंबेडकर अकादमीने फेब्रुवारी १९९४ पासून सुरु केला. हा उपक्रम एका विशिष्ट परिस्थितीत सुरु केला गेला. १९९२ साली बाबरी मशीद सांप्रदायिक शक्तींनी उद्ध्वस्त करून भारताच्या इतिहासात एका कृष्णकृत्याची नोंद केली. भारतीय संविधानाच्या मूळ भूमिकेवरच आघात करण्यात आला. पुरोगामी विचारवंत या घटनेने काही काळ हादरून, गोठून गेल्यासारखे झाले होते. आपापसात चर्चा झडत होत्या, पण त्याला संघटित व्यासपीठ नव्हते. 'धर्म' ही मानवी जीवनातील एक महत्त्वाची संस्था. तिचा आधार घेऊन 'धार्मिक' म्हणवणारे राजकारणी सर्वसामान्य धार्मिक लोकांना चिथावत होते, भडकवत होते, पण त्यातून असे काही होईल असे वाटले नव्हते. सर्वोच्च न्यायालयात बाबरी मशिदीच्या वास्तूला धक्का न लागण्याची हमी दिली गेली होती, त्यामुळे असे काही घडेल, हे सांगितले तरी कुणाला पटले नसते. 'धर्म' नावाच्या गोष्टीत या टोकाला जाण्याची ताकद असेल तर धर्माला केवळ 'अफूची गोळी' म्हणून भागण्यासारखे नव्हते. म्हणून 'धर्म' या गोष्टीचा परिपूर्ण, तपशीलवार असा विचार करण्याची तसेच धर्माचे आजच्या राजकारणातील स्थान, स्तोम, त्याचे सामान्य माणसाच्या विकासावर होणारे परिणाम, त्यातून होणारे निर्घृण दंगे व परिणामी यातून विस्कटत जाणारा देश, हे सारे सामान्य माणसापुढे उघड करण्याची गरज अकादमीला वाटली. त्यातच विसावे शतक संपायला अवघी सहा वर्षे राहिली होती. आधीच्या शतकांनी मिळून जेवढा परिणाम मानवी जीवनावर केला होता, त्यापेक्षा कितीतरी पटीने अधिक परिणाम एकोणिसाव्या व विसाव्या शतकांनी केला आहे. विसाव्या शतकाने मानवी समाजांमध्ये असंख्य असे क्रांतिकारक बदल घडवून आणले. तेव्हा विसाव्या शतकाची सुरुवात ते शेवट अशा शंभर वर्षांच्या काळात मानवी समाज-संस्कृतीवर परिणाम करणाऱ्या गोष्टींचा उदय, अस्त किंवा त्या गोष्टींचे दृढ किंवा क्षीण होणे, हा एका सातत्याचा परिपाक असला पाहिजे. म्हणजेच केवळ वरवर विचार करून बाबरी मशिदीच्या पाडावाची उकल होणे कठीण आहे. अशा प्रकारे एका धक्कादायक घटनेने अंतर्मुख होऊन या निमित्ताने विसाव्या शतकातील धर्मकारण, राजकारण, समाजकारण, संस्कृती या सगळ्याच क्षेत्रांतील घडामोडींचा सर्वस्पर्शी आढावा घेतला तर कसे अशी कल्पना पुढे आली. 'विचारवेध'चा जन्म अशा रीतीने झाला.

२

विसाव्या शतकातील विविध क्षेत्रांतील चढ-उतारांचा साक्षेपी आढावा घेताना अर्थातच एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धाचा संबंध व संदर्भ अटळ असाच होता. कारण भारताच्या इतिहासात तरी एकोणिसाव्या शतकाचे महत्त्व वादातीत असे आहे. एकोणिसाव्या शतकाअखेरीस भारतीय समाजातील सुशिक्षितांचे गट आपल्या न्याय्य मागण्यांसाठी, लोकशाही हक्कांसाठी संघटित होत होते. राष्ट्रसभेच्या स्थापनेनंतर भारतीयांचे संघटित राजकारण उदयाला येत होते, आकार घेत होते. ते राजकारण देशव्यापी करण्याचे प्रयत्नही गतिमान झाले होते. गरिबी, शोषण, अन्याय, भेदभावाची वागणूक, जन्मजात विषमता व त्या सर्वांचे आर्थिक पदर हळूहळू उलगडू लागले होते. भारतीय समाजाच्या दृष्टीने व एकूणच मानवजातीच्या दृष्टीने एकोणिसाव्या शतकाचा शेवट आशादायी होता. मार्क्सची भांडवलशाहीची चिकित्सा जगासमोर येऊन 'मुक्ती'च्या वाटेवरील संघर्षाची ती नांदी झाली होती. भांडवलशाहीच्या प्रेरणेने झालेली यंत्राधिष्ठित कारखानदारीची वाढ, भांडवलशाहीने दाखविलेले वैपुल्याचे स्वप्न, विषमता नाहीशी होण्याची व समताधिष्ठित नव्या समाजाची अंधूक आशा ही








मानवजातीला एकोणिसाव्या शतकाने दिली होती. याचे कारण, एकोणिसावे शतक हे औद्योगिक क्रांतीच्या प्रक्रियांनी व परिणामांनी प्रभावित झालेले होते. यंत्रयुगाने निर्माण केलेल्या बहुप्रसवा उत्पादन संस्कृतीच्या बळावर निसर्गावर विजय मिळवण्याची महत्त्वाकांक्षा माणसाच्या मनात एकोणिसाव्या शतकात जोपासली गेली. वैपुल्यातून सर्व आर्थिक प्रश्नांची उत्तरे मिळतील, हा विश्वासही याच शतकाने दिला होता. म्हणूनच एकोणिसावे शतक हे जगभरच्या माणसांसाठी 'आशा-अपेक्षां'चे शतक म्हणून ओळखले गेले. एकोणिसाव्या शतकाने दाखवलेली ही आशा विसाव्या शतकातील रशियन राज्यक्रांती, आशिया-आफ्रिका खंडातील स्वातंत्र्याचे लढे, यांसारख्या घटनांनी पल्लवित केली. विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात झालेल्या रशियन राज्यक्रांतीने तिसऱ्या जगातील दडपल्या गेलेल्या समस्त श्रमिक-दलितांना मुक्तीचा एक मार्ग दाखवला. दुसरा मार्ग गांधी-विचारांनी दाखवला. भारताच्या संदर्भात फुले-आंबेडकरी प्रवाहाने खऱ्याखुऱ्या समतेचे प्रश्न ऐरणीवर आणून दलित समूहांत जागृती निर्माण केली.

विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात अनेक देश स्वतंत्र झाले, वसाहती संपुष्टात येऊ लागल्या. विज्ञान, तंत्रज्ञान, विचारप्रणाली, शिक्षण आदी क्षेत्रांत प्रचंड बदल होऊ लागले. जगभरच्या तरुणाईत एक नवा जोम दिसू लागला. समाजाच्या बांधणीतील आपला वाटा उचलण्याची भूमिका घेऊन विविध प्रश्नांवर तरुणाई लढू लागली. कामगार/श्रमिकांच्या चळवळींनी जोर धरला. आजवर दबलेले सामाजिक गट एका नव्या आशेने संघटित होऊन आपल्यावरील अन्यायाचा प्रतिकार करु लागले होते. एका बाजूला मुक्तिदायी लढे वेग घेऊन भारतीय जनतेची आशा पल्लवित करत असतानाच दुसऱ्या बाजूला काहीसे कटू वास्तवही पुढे येत होते. स्वातंत्र्योत्तर काळात संविधानाने दिलेला उदारमतवादी स्वातंत्र्याचा अवकाश लोकांना उपलब्ध होऊनही उदारमतवादी लोकशाही ही धनिकधार्जिणी होत असल्याचे वर्तमान प्रकट होत होते. या धनिकधार्जिण्या लोकशाहीचे दुष्परिणामही ठळकपणे पुढे येत होते. विज्ञानाचा वापर करून नवीन तंत्रज्ञानाच्या आधारे पश्चिमी वर्चस्वाचा उदय वेगळ्या मार्गाने होत होता. विकसित राष्ट्रांच्या हाती अणुशक्तीवर आधारलेली शस्त्रास्त्रे होती व नव्या वर्चस्वाचा ही शस्त्रास्त्रे आधारही होती. 'राज्या'ची दमनकारी शक्ती सर्वंकष होती तर मुक्तिदायी लढ्यांच्या विजयाची आशाही अशी सर्वंकष राज्यसंस्था ताब्यात 'येण्या'वर अवलंबून होती. ही राज्यसंस्था क्रांतीच्या मार्गाने ताब्यात येईल की संसदीय लोकशाहीच्या मार्गाने, त्यासाठी हिंसेचा वापर करावयाचा की केवळ अहिंसक मार्गांचा वापर करावयाचा, परिवर्तनाचे मार्ग कोणकोणते असू शकतात - अशा प्रश्नांनी तात्कालीन विचारविश्व भरुन राहिले होते. विसाव्या शतकाने विज्ञान-तंत्रज्ञानाचा वापर करुन झालेली दोन संहारक महायुद्धे व त्याचे कायम राहणारे दुष्परिणाम पाहिले, त्याबरोबरच अण्वस्त्राधारित नव्या युद्धाची भीतीही सतत बाळगली.

वैज्ञानिक संशोधनाच्या क्षेत्रात तर विसाव्या शतकाने 'न भूतो न भविष्यति' अशी क्रांती घडवून आणली. आयुर्मानातील वाढ त्यामुळे दृश्यमान झालीच, पण पर्यावरणाचे धोकेही दृग्गोचर होऊ लागले. भौतिक संपत्तीची प्रचंड वाढ, त्याचे दुष्परिणाम व मर्यादाही विसाव्या शतकाने पाहिल्या. एकोणिसाव्या शतकाची अखेर एका आशावादात झाली होती, तर विसाव्या शतकाची अखेर त्या आशेला फोल ठरविणारी ठरली. हिंसा, क्रौर्य यांची संस्थात्मक बांधणी भारतात तर विसाव्या शतकाच्या आरंभीच्या दशकापासून त्या शतकाच्या अखेरपर्यंत 'धर्मा'च्या नावे झाली, तर नव्वदीच्या दशकाअखेर जागतिकीकरणाने बेरोजगारांचे तांडे निर्माण करून या हिंसेला फौजफाटा पुरविला. नागरी समाजाची प्रस्थापना जवळपास अशक्य वाटावी अशी परिस्थिती विसाव्या शतकाच्या अखेरीला पाहायला मिळत आहे. राजकीय नेतृत्वाची जनमानसावरील पकड ढिली असल्याचे व काही अपवाद वगळता राजकीय पक्ष. ५ रूपांतर टोळ्यांमध्ये होतानाचे दारुण वास्तव विसाव्या शतकाअखेर शिल्लक राहिलेले दिसते. शिक्षणप्रसार होऊनही जगभरच्या निरक्षरांपैकी ५४ % एवढी येथे असलेली निरक्षरांची संख्या, धर्मनिरपेक्षतेऐवजी धर्मांधतेकडे वाटचाल, भांडवलदारांचे व भांडवलाचे जागतिकीकरण, नवसाम्राज्यवादाच्या आक्रमणा-मुळे जीवनाची सर्व क्षेत्रे बाजारव्यवस्थेच्या स्वाधीन करून माणसांचे रूपांतर साचेबंद, भोगलोलुप व अविचारी मठ्ठ ग्राहकात होणे; धर्माधिष्ठित फॅसिस्ट गटांचे सामूहिक उन्मादाचे राजकारण व ४० % च्या आसपास असणारी दारिद्र्यरेषेखालील लोकसंख्या हे विसाव्या शतकाअखेरचे भारताचे भीषण वास्तव आहे. भारतीय राज्यव्यवस्थेच्या








विसाव्या शतकामधील वाटचालीला जमेची बाजू नाहीच असे नाही पण मौलिक महत्त्वाच्या आणि समताधिष्ठित समाजाच्या दिशेने करावयाच्या क्रांतिकारक, सामाजिक, आर्थिक प्रगतीच्या दृष्टीने विसावे शतक हे अपेक्षाभंगाचेच शतक म्हणावे लागेल. भारतीय नागरिकांच्या मूलभूत हक्कांमधील समानतेचे हक्क, नीतिनिर्देशक तत्त्वांमधील आर्थिक लोकशाहीच्या तरतुदी, स्त्रिया, बालके, अनुसूचित जाती-जमाती, भटके विमुक्त, असंघटित कष्टकरी यांच्यासाठी वेळोवेळी केलेल्या विशेष संरक्षणात्मक कायदेशीर तरतुदी इत्यादींच्या आधारे ज्या अपेक्षा या शतकाच्या मध्यावर उंचावल्या होत्या, त्या ते शतक संपण्यापूर्वीच धुळीस मिळाल्या. अपेक्षा आणि प्रत्यक्ष फलश्रुती यात विसाव्या शतकाअखेर प्रचंड दरी पडली आहे. हे सारे विसाव्या शतकातच घडले; पण ते का व कसे घडले? त्याची प्रक्रिया कोणती होती? त्याला जबाबदार कोण? असे अनेक आनुषंगिक प्रश्न विसाव्या शतकाचा विचार करताना डोळ्यांसमोर उभे राहतात. विचारवेध संमेलनाने हे सारे प्रश्न आपल्यापरीने उलगडण्याचा प्रयत्न एकेका क्षेत्राचा आढावा घेताना केला आहे.

विचारवेध संमेलनाची सुरुवात स्वाभाविकपणे 'विसाव्या शतकातील धर्मचिंतन' या विषयाने झाली. नंतरच्या संमेलनात 'परिवर्तनवादी चळवळींची सामाजिक फलश्रुती', 'स्वातंत्र्योत्तर भारतीय राजकारण', 'भारतीय अर्थकारणाची बदलती क्षितिजे', 'विसाव्या शतकातील जातिव्यवस्था', 'विसावे शतक आणि समताविचार', 'विसाव्या शतकातील संस्कृती विचार', 'भारतातील समाजपरिवर्तन : संकल्पना, प्रक्रिया व व्यवहार', 'नवसाम्राज्यवादी युगातील भारतीय लोकशाहीसमोरील आव्हाने', 'जागतिकीकरण व भारतीय समाजासमोरील यक्ष प्रश्न', 'समकालीन शिक्षण : अपेक्षा आणि वास्तव', 'विकास : वाटचाल आणि समस्या', 'वंचित समूह : सद्यःस्थिती आणि भवितव्य' आदी विषयांची सांगोपांग चर्चा झाली. वरील संमेलनांचे अध्यक्षपद अनुक्रमे प्रा० मे० पुं० रेगे, प्रा० डॉ० रावसाहेब कसबे, प्रा० डॉ० य० दि० फडके, प्रा० राम बापट, प्रा० नलिनी पंडित, प्रा० डॉ० भा० ल० भोळे, प्रा० डॉ० आ० ह० साळुंखे, प्रा० डॉ० गोपाळ गुरु, डॉ० एन० डी० पाटील, श्री० वसंत पळशीकर, प्रा० डॉ० रमेश पानसे, साथी बगाराम तुळपुळे, प्रा० डॉ० यशवंत सुमंत या मान्यवरांनी भुषविले होते.

विचारवेध संमेलनाचा उपक्रम आंबेडकर अकादमीने आजवर अत्यंत गांभीर्याने राबविला आहे. विषय आणि आशय यांच्या सुसंगतीसह या उपक्रमाचे सातत्यही राखले आहे. विसाव्या शतकाची सर्वांगीण चिकित्सा करत असताना विसाव्या शतकाची वर उल्लेख केलेली जी उपलब्धी आहे, तिचेही भान विषयांच्या निवडीत राखण्याचा प्रयत्न आजवर केला गेला आहे. भारतीय समाजाला भेडसावणारे कळीचे प्रश्न, त्यांच्या सर्व पैलूंसह लोकांपुढे मांडले जातील, त्यांच्या उत्तराच्या दिशा सूचित होतील ही काळजी संमेलनाचे अध्यक्ष व वक्ते यांची निवड करताना तसेच सत्रविषयांची आखणी करताना घेण्यात आली. विविध संमेलनांतील सत्रविषयांच्या शीर्षकांवर नजर टाकली तरी याची प्रचिती येईल.

संमेलनांच्या अध्यक्षांची निवड करताना संबंधित अभ्यासकाचा त्या विषयातील व्यासंग, अधिकार, त्याचे आजवरचे लेखन, पुरोगामी मूल्यांशी असलेली बांधिलकी याचा नेहमीच विचार केला गेलेला आहे. आजवरचे संमेलनाध्यक्ष व संमेलनविषय यांची वर दिलेली यादीच याची साक्ष देते. संमेलनाच्या अध्यक्षाची निश्चिती झाली की, त्यांना संमेलनातील सत्रविषयांची कल्पना दिली जाते. हेतू हा की, संमेलनातील सत्रविषय व त्यांची मांडणी करणाऱ्यांच्या भूमिकांची अध्यक्षांना माहिती व्हावी व त्याच पद्धतीने अध्यक्षीय भाषणाची आखणी व्हावी. अध्यक्षीय भाषणा-विषयीच्या अपेक्षा अध्यक्षांना कळवल्या जातातच. तरीही त्या त्या विषयाच्या चौकटीत मांडणी करण्याचे पूर्ण स्वातंत्र्य अध्यक्षांना असतेच. त्याचप्रमाणे सत्रविषयातील वक्त्यांनाही असे स्वातंत्र्य असतेच. संमेलनविषयाची व त्याच्या तपशीलाची आखणी करताना 'तळागाळातील सामान्य माणूस' हा या चिंतनाचा केंद्रबिंदू असतो. त्याचे प्रश्न, त्याची मुक्ती, त्याचे भागधेय या साऱ्यांना केंद्रस्थानी ठेवूनच विसाव्या शतकाची चिकित्सा विचारवेध संमेलनांमध्ये केली गेली. ही चिकित्सा करत असताना मार्क्स-फुले-गांधी-आंबेडकर यांच्या विचारसूत्रांचे पायाभूत प्रामाण्य राखले गेले. हे प्रामाण्य राखत असताना पोथीनिष्ठा व साचेबंदपणा यांना मात्र फाटा दिला गेला. बदलत जाणारे समाजवास्तव व या विचारसूत्रांचे प्रामाण्य यांच्या क्रिया-प्रतिक्रियांतून संमेलनातील चर्चा



अनुक्रमणिका

झडल्या. विसाव्या शतकाची चिकित्सा करताना ती भारताच्या संदर्भात प्रामुख्याने होणे स्वाभाविकच होते. पण त्यासाठी आवश्यक असणाऱ्या जागतिक संदर्भाचेही भान राखले गेले. म्हणूनच भारतीय समाजाने स्वीकारलेली उद्दिष्टे, त्याच्या न्याय्य आकांक्षा व त्यांची फलश्रुती याची चर्चा सामान्य माणसाला केंद्रस्थानी ठेवून झाली. सामान्य माणसाला उपलब्ध असणारा जगण्याचा अवकाश हा सर्व चर्चांचा केंद्रबिंदू राहिला. या संदर्भात विकासप्रक्रिया, राजकारण, समाजकारण, अर्थकारण, विज्ञान-तंत्रज्ञान, धर्मवाद, हिंसेमुळे निर्माण झालेले प्रश्न, वाढती झुंडशाही, अस्मितांचे राजकारण, पर्यावरणीय गंडांतरे, विविध विचारप्रणालींची चिकित्सा हे आजपर्यंतच्या संमेलनांतील चर्चांचे विषय अर्थपूर्ण ठरले.

विचारवेध संमेलनांतील वक्त्यांची निवड करताना असेच पथ्य पाळले जाते. सवंग लोकप्रियता, मनोरंजन, फर्मास वक्तृत्व यांना विचारवेधच्या व्यासपीठावर जागा नाही. केवळ गुणवत्ता, व्यासंग व वकूब याच निकषांवर सत्रांसाठीचे वक्ते निवडले जातात. या निवडीच्या वेळी जात-धर्म-लिंग-प्रदेश आदी घटकांचाही विचार गुणवत्ता, व्यासंग व वकूब केंद्रस्थानी ठेवूनच झाला व होतो. संमेलनाध्यक्षांचे भाषण मुद्रित स्वरूपात सर्वांनाच उपलब्ध करुन दिले जाते. ही प्रथा आजवर कसोशीने पाळली गेली आहे. विचारवेध संमेलनात श्रोत्यांनाही सहभागाची संधी आवर्जून दिली जाते. सामान्यत: संमेलनाच्या तीन दिवसांत अध्यक्षीय भाषण-उद्‌घाटन याशिवाय तीन-साडेतीन तासांची किमान चार सत्रे तसेच शक्यतो महाराष्ट्राबाहेरील संमेलनविषयातील अधिकारी व्यक्तींची एक वा दोन व्याख्याने असा कार्यक्रम असतो. सत्रविषयाची मांडणी करणाऱ्याला एक तास, त्या मांडणीवर प्रतिसादात्मक चर्चा करणारे दोन वा तीन चर्चक यांना दीड तास व उर्वरित एक तास श्रोत्यांच्या लेखी प्रश्नांना दिला जातो. श्रोत्यांचा प्रतिसाद हा उत्तरोत्तर वाढतच राहिला आहे, हे आवर्जून नमूद करावेसे वाटते.

विचारवेध संमेलन ही घटना आता महाराष्ट्राच्या विचारविश्वात घट्टपणे रुजलेली आहे. मराठी विचारविश्वाशी गंभीरपणे निगडीत असणाऱ्या विचारशील नागरिकांना 'विचारवेध' हा शब्द आता परका वा उपरा वाटत नाही. आतापर्यंतच्या तेरा विचारवेध संमेलनांतील अतिशय मूलभूत विषयांवरील निवडक निबंधांचा हा संग्रह मराठी वाचकांच्या हाती देताना 'विचारवेध'ची मराठी विचारविश्वात रुजलेली ओळख हाच आमचा आधार आहे.

३

आतापर्यंत झालेल्या तेरा विचारवेध संमेलनांमध्ये जवळपास साठ-सत्तर निबंधांची मांडणी झाली. विषय आणि आशय या दृष्टीने जवळपास सर्वच निबंध सारख्याच गुणवत्तेचे आणि तोलामोलाचे आहेत. त्यातील निवडक निबंधांची या संग्रहासाठी निवड करणे हे काम खरोखरच अवघड होते. प्रस्तुत संग्रहासाठी अशी निवड करताना समाजजीवनाची विविध क्षेत्रे, त्यातील बदल, त्यातील आव्हानांचे स्वरूप या घटकांचा त्या त्या निबंधात घेतलेला वेध, अधिक सूक्ष्मपणे विचारात घ्यावा लागला. एकाच विषयावरील वेगवेगळ्या भूमिका व पैलूही समोर आले. उदाहरणच द्यायचे झाले तर या संग्रहातील श्री० वसंत पळशीकर व श्रीमती छाया दातार यांचे औद्योगिक संस्कृतीच्या समीक्षेवरचे लेख किंवा श्रीमती रेखा ठाकूर व श्री० अरविंद वैद्य यांचे शैक्षणिक प्रश्नांवरचे लेख, यांचे देता येईल. वाचकांना एकाच विषयावरचे भिन्न भिन्न पैलू वाचायला मिळावेत हा हेतूही अशा काही निबंधांच्या निवडीमध्ये ठेवला आहे. या संग्रहातील सारेच निबंध गुणवत्तेच्या दृष्टीने व चिंतनशीलतेच्या दृष्टीने मूलग्राही ठरतील असेच आहेत. त्यामुळे या निबंधांचे संग्रहमूल्य, विचारशील नागरिक, परिवर्तनशील चळवळीतील कार्यकर्ते, अभ्यासक व विविध सामाजिक शास्त्रांचे विद्यार्थी यांच्यासाठी निश्चितच वाढले आहे. केवळ आकारभयास्तव ज्या अन्य निबंधांचा समावेश या संग्रहात केलेला नाही, त्यांचेही संपादन यथावकाश अकादमीतर्फे प्रकाशित करू. डॉ० यशवंत सुमंत, डॉ० प्रदीप पाटकर, श्रीमती छाया दातार व श्रीमती रेखा ठाकूर या अभ्यासकांचे दोन दोन निबंध निरनिराळ्या विभागांत या संग्रहात आढळतील. हे निबंध अर्थातच वेगवेगळ्या संमेलनात सादर झालेले आहेत. या निबंधांच्या विषयांची प्रातिनिधिकता लक्षात घेऊनच हा अपवाद करावा लागला आहे.

या संग्रहातील समाविष्ट निबंधांचे एक ठळक वैशिष्ट्य म्हणजे भारतीय समाजातील ताणतणावांचे विविध स्तर आणि गुंतागुंत त्यातून प्रातिनिधिकरीत्या व्यक्त होते. माणसांच्या शोषणाचे ठळक व सूक्ष्म पदर, तसेच पातळ्या

यांचेही दिग्दर्शन त्यातून होते. निबंधविषयांचे अचूक आकलन, चिंतनशील मांडणीची शैली व आवाका असणाऱ्या अभ्यासकांचे हे निबंध असल्याने तपशील, वैविध्य, माहिती, सिद्धान्तन व संदर्भ यांसह हे निबंध आशयाच्या दृष्टीने अर्थपूर्ण झाले आहेत. या निबंधांचे दुसरे वैशिष्ट्य म्हणजे या साऱ्या निबंधांना विसाव्या शतकातील चर्चाविश्वाची परिभाषा लाभली आहे. विसाव्या शतकातील विविध क्षेत्रांतील घडामोडी, प्रक्रिया व फलिते यांची संदर्भचौकट या निबंधांना व्यापून आहे. पण चर्चाविश्वाची परिभाषा असूनही या संग्रहातील निबंध बोजड, क्लिष्ट झालेले नाहीत, तर त्यांची वाचनीयता अबाधित राहिली आहे. सामाजिक शास्त्रांच्या अध्ययनकर्त्यांसाठी अभ्यास, संशोधन, माहिती व संदर्भ या साऱ्या दृष्टींनी हे निबंध उपयुक्ततेच्या पर्याप्त पातळीवर पोचलेले आहेत. डॉ० सुहास पळशीकरांसारख्या चिकित्सक अभ्यासकाच्या निबंधात जात-प्रदेशवाद आणि भारतातले लोकशाही राजकारण यातील संबंधांचा, तोलाचा सूक्ष्म पण व्यामिश्र तसेच विस्तृत असा पट सहजपणे उलगडत जातो. डॉ० प्रदीप पाटकरांसारखा मनोविकारतज्ज्ञ, समाजमानसशास्त्रीय व राजकीय संदर्भात आजच्या हिंसेची व हिंसकतेच्या गुंतागुंतीची उकल वाचकांपुढे करतो. एकोणिसाव्या शतकाचा वारसा घेऊन आलेल्या विसाव्या शतकातल्या तथाकथित 'विकास'केंद्री औद्योगिक संस्कृतीने माणसाच्या 'माणूस'पणा-वरच परिणाम केला आहे. या संस्कृतीच्या निर्घृण स्पर्धात्मकतेची समीक्षा श्री० वसंत पळशीकर व श्रीमती छाया दातार यांच्या निबंधांत पर्यायी उपायांच्या दिशेसह स्पष्ट होते. डॉ० यशवंत सुमंत यांच्या 'बहुजनवादी राजकारण' या निबंधात आजच्या काही परवलीच्या शब्दांची व्याख्या व आशय तर स्पष्टपणे येतोच पण बहुजनवादाची दिशा, योगदान व मर्यादाही सूचित होतात. डॉ० सुमंतांच्या दुसऱ्या निबंधात विसाव्या शतकातील हिंदू धर्मातील चिंतनाची समाज-विन्मुखता उघड होते. भांडवलशाही आणि समाजवादाच्या सिद्धान्तनाच्या चर्चाविश्वात गेली काही वर्षे 'साधर्म्य सिद्धान्त' (Convergence Theory) मांडला जात आहे. सोवियत रशियाच्या अस्तानंतरच्या वातावरणात भांडवलशाहीच्या व समाजवादाच्या बदलत्या स्वरूपांचीही चर्चा सातत्याने होते आहे. या संदर्भात प्रा० सदानंद वर्दे यांच्या 'भांडवलशाही व समाजवादाचे बदलते स्वरुप' या निबंधात तत्कालीन चर्चाविश्वाचा परामर्श व बदलत्या अर्थकारणाची चाहूल समर्थपणे व्यक्त झाली आहे.

भारतात आणि महाराष्ट्रातही गेली काही वर्षे सातत्याने दुष्काळ पडतो आहे. शिवाय जागतिक पातळीवरही नव्या जलनीतीची चर्चा सुरू आहे. भारत सरकारने (व महाराष्ट्र सरकारनेही) नवी जलनीती जाहीर केली आहे. पाणी, दुष्काळ आणि विकास यांचा आंतरसंबंध स्पष्ट करणारा श्री० दत्ता देसाई यांचा विस्तृत निबंध नव्या जलनीतीची चिकित्सा करून जलयुद्ध की जलक्रांती असा रोकडा सवाल उभा करतो. जलविषयक विविध अहवाल, धोरणविषयक निवेदने आदींचे संदर्भ घेऊन श्री० देसाई यांच्या या निबंधात उपाययोजनाही सुचवली गेली आहे. पाणीप्रश्नाच्या अभ्यासकांना, कार्य-कर्त्यांना श्री० देसाई यांचा लेख केवळ प्रश्नाचे आकलनच नाही तर एक वैचारिक हत्यारही उपलब्ध करून देतो. भारतात राष्ट्रवाद व राष्ट्रबांधणी यांची चर्चा पुष्कळ काळ चालू आहे. ही चर्चा वैदिक परंपरेचा गौरव केंद्रस्थानी ठेवून सांप्रदायिकतेच्या अंगाने अलीकडच्या काळात, विशेषत: संघपरिवाराकडून, जोमाने केली जात आहे. पण मुळातच भारतातील राष्ट्रनिर्मितीची प्रक्रिया प्रचंड तणावाखाली असून तिचे तत्त्ववैचारिक व सामाजिक आधारही वास्तवात समतेच्या तत्त्वांपासून पुष्कळ अंतरावर आहेत, याचे भान राखले जात नाही. हे भान डॉ० भा० ल० भोळे यांच्या 'भारतीय राष्ट्रनिर्मितीचे तत्त्ववैचारिक व सामाजिक आधार' या निबंधात ऐतिहासिक दृष्टिकोन व समतोल पण भविष्यकेंद्री भूमिकेच्या अंगाने व्यक्त झाले आहे. भारतातील परिवर्तनवादी सामाजिक चळवळींच्या चर्चाविश्वात जातीच्या प्रश्नाला मूलभूत महत्त्व आहे. भारतीय समाजातील 'जात'वास्तव हे अनेक कारणांनी राष्ट्रनिर्मितीची प्रक्रिया, वर्गलढ्याची प्रक्रिया यांच्या आड येत असल्याचे आपण पाहतो. त्याचवेळी विविध जाती-जमातींमधील श्रमिक, कष्टकरी यांनी एकत्रित लढण्याची गरजही आपण अधोरेखीत करत असतो. यातूनच दलितमुक्ती चळवळ, तळागाळातील लोकांचे संघटन अशा प्रकारच्या सामाजिक हालचाली होत असतात. त्यातून प्रत्यक्षात जातिव्यवस्थेची मुळे थोडीशी ढिली झाली असली तरी गाभ्याशी 'जात' बदललेली नाही. मग विसाव्या शतकाच्या चळवळींचा जातिसंस्थेवर काय परिणाम झाला? या परिणामाची सविस्तर चर्चा कॉ० कुमार शिराळकर यांच्या

जातिव्यवस्थेवरील दीर्घ निबंधात आली आहे. त्याचबरोबर बदलत जाणाऱ्या समाजवास्तवात परिवर्तनवाद्यांचे जुने आधारगट निरुपयोगी ठरले असून नव्या वास्तवातील आधारगटांचा शोध घेतल्याशिवाय क्रांतीचे पाऊल पुढे पडणार नाही या वस्तुस्थितीकडे डॉ० आनंद तेलतुंबडे यांनी आपल्या निबंधात लक्ष वेधले आहे. तळागाळातील लोकांच्या मुक्तीचे राजकारण करताना येणारे पेच - त्यांची चर्चा डॉ० गोपाळ गुरूंच्या निबंधात आली आहे. विसाव्या शतकाच्या अखेरीस प्रसारमाध्यमांचा प्रभाव हा जवळपास जीवनाच्या सर्व क्षेत्रांवर झाला आहे. आताची प्रसारमाध्यमे विविध हितसंबंधांची वाहकही बनली आहेत. त्यामुळे आजच्या स्पर्धेच्या वातावरणात त्यांच्या अर्थकारणालाही महत्त्व आले आहे. या अर्थकारणाची सामाजिक-राजकीय संदर्भ कायम ठेवून ग्राहककेंद्री चर्चा प्रा० जयदेव डोळे यांच्या निबंधात आली आहे. प्रसारमाध्यमांचे स्वरूप, आर्थिक हितसंबंध व ग्राहक यांच्या परस्परसंबंधांचा आलेख या निबंधात व्यक्त झाला आहे.

भारतातील धर्मनिरपेक्षतेला अलीकडच्या काळात (संघपरिवाराकडून) 'नकली' म्हणून हिणवले जाते. त्या जागी हिंदू जमातवाद्यांना अभिप्रेत असलेली तथाकथित 'असली' धर्मनिरपेक्षता आली पाहिजे असे कंठरवाने सांगितले जाते. बाबरी मशिदीच्या पाडावानंतर ही चर्चा जोरदारपणे झाली. त्या संदर्भातील डॉ० अशोक चौसाळकरांचा निबंध भारतीय संविधानातील तरतुदी, धर्मनिरपेक्षतेचे सामाजिक-राजकीय संदर्भ यांची चर्चा करतो. पं० जवाहरलाल नेहरूंच्या सक्रिय आस्थेने व पुढाकाराने भारताचे विज्ञान धोरण जाहीर झाले व बऱ्याच अंशी अमलातही आले. तरीही धोरणविषयक व अंमलबजावणीतील उणिवा या आहेतच. त्या धोरणांची व उणिवांची चर्चा डॉ० चिंतामणी देशमुख यांच्या निबंधात आहे. (दुर्दैवाने डॉ० देशमुख यांचे अगदी अलीकडे निधन झाल्याने हा संग्रह त्यांना पाहता येणार नाही याचे शल्य कायमचे मनी राहील.) 'भारतातील इतिहासलेखन' हा विषय अलीकडच्या काळात निरनिराळ्या कारणांनी चर्चेत आहे. जुना सर्व इतिहास (ब्राह्मणी म्हणून) नाकारण्यापासून ते नवा (बहुजन) इतिहास लिहिण्याच्या घोषणांपर्यंत इतिहासलेखनाची चर्चा चालू आहे. पण हे करत असताना इथल्या दुय्यम मानल्या गेलेल्या जनसमूहांच्या इतिहासाचे काय? असा हा प्रश्न उपस्थित होतो. गेली काही वर्षे अनेक अभ्यासकांनी Subaltern History ची संकल्पना व त्यावर आधारित इतिहास लिहिण्याचा प्रयत्न चालविला आहे. या प्रयत्नांची दखल, महत्त्व, त्यांचे योगदान व मर्यादा दाखवणारा श्री० प्रवीण चव्हाण यांचा लेख इतिहासाच्या अभ्यासकांसाठी महत्त्वाचा ठरेल. सोलापूरच्या सहाव्या विचारवेध संमेलनात विसाव्या शतकातील विविध विचारप्रणालींची चिकित्सा करण्यात आली होती. याच्यात स्त्री-प्रश्नांचीही चिकित्सा केली गेली. या प्रश्नांच्या संदर्भात गांधी, फुले-आंबेडकर यांच्या भूमिकांच्या अंगाने स्त्री-प्रश्नांवर चर्चा झाली. श्रीमती रेखा ठाकूर यांनी गांधीविचारांच्या दृष्टीतून स्त्री-प्रश्नाची मांडणी केली. त्यांचा हा निबंध आवर्जून या संग्रहात समाविष्ट केला आहे. गांधीविचारांमुळे स्त्रियांचा सार्वजनिक अवकाश कसा वाढला, त्याला कसे बळ मिळाले याचा तसेच गांधींच्या स्त्रीविषयक भूमिकेचा ऊहापोह श्रीमती ठाकूर यांच्या निबंधात विस्ताराने आला असून गांधी-विचारांच्या मर्यादाही त्यात स्पष्ट केल्या गेल्या आहेत. फुले-आंबेडकरी विचारप्रवाहाचा संदर्भ घेतल्याशिवाय स्त्री-चळवळी पुढे जाणार नाहीत याची जाणीव श्रीमती लता प्र० म० यांच्या निबंधात व्यक्त झाली आहे.

विसाव्या शतकाअखेरचे दशक हे भारतीयांसाठी फारच कळीचे ठरले. १९९१ पासून जागतिकीकरण पर्वाचा प्रत्यक्ष आरंभ झाला. इलेक्ट्रॉनिक तंत्रज्ञानाने जग अत्यंत जवळ आणले. एका शतकात होऊ शकणारी उलथापालथ जागतिकीकरण पर्वाने एका दशकातच घडवली. आंतरराष्ट्रीय पातळीवर केल्या गेलेल्या करारांनी भारतीय संसदेचे सार्वभौमत्व काही बाबतीत मर्यादित झाले. एतद्देशीय सरकार व वैश्विक प्रशासन अशी काहीशी अवस्था आज अनुभवाला येते. स्वाभाविकच जागतिकीकरणाने काय घडले? काय घडणार? त्याचे परिणाम काय असतील? याची चर्चा सुरू झाली. राज्यसंस्थेने अनेक क्षेत्रांतून माघार घ्यावयाला सुरुवात केल्याने दलित-शोषित-वंचित घटकांचा वाली कोण? संविधानातील अनेक तरतुदींची आधीच सदोष अंमल-बजावणी झाली; त्यामुळे या तरतुदींचे राज्यसंस्थेच्या माघारीमुळे काय होणार? या व अशा प्रश्नांना चर्चेत महत्त्व आले. या संग्रहातील डॉ० सुबोध वागळे यांचा लेख भारतीय राज्यसंस्थेच्या एकंदर कामगिरीवर जागतिकीकरणाच्या चर्चाविश्वाच्या अंगाने नजर टाकतो व त्याची चिकित्साही

करतो. यासाठी वीज प्रश्नातील अनुभव व व्यवहार डॉ० वागळे यांनी आधाराला घेतला आहे. राज्यसंस्थेला भविष्यातही कोणती भूमिका बजावावी लागेल याचे दिग्दर्शनही त्यांच्या लेखात आहे. जागतिकीकरणाच्या प्रक्रियेतून येथील विकासप्रक्रिया कशी पुढे जाईल तसेच आधीच्या विकास-प्रक्रियेतून जे प्रश्न उभे राहिले आहेत, त्यांचे पुढे काय होईल? जागतिकीकरणाने खरोखरच कोणत्या देशांचा व देशांतर्गत कोणत्या घटकांचा फायदा होईल? विकासाचे प्रतिमान कोणते असावे? अशांसारख्या प्रश्नांचा विचार ज्येष्ठ अर्थशास्त्रज्ञ डॉ० श्रीनिवास खांदेवाले यांच्या विस्तृत निबंधात आढळेल. तपशील, आकडेवारी, विविध अहवालांचे व अभ्यासकांचे संदर्भ, तौलनिकता व प्रश्नांची अचूक मांडणी या गुणवैशिष्ट्यांनी भरलेला डॉ० खांदेवाले यांचा हा निबंध हा राजकीय अर्थशास्त्राच्या चर्चाविश्वात मोठी भूमिका बजावेल. जागतिकीकरणाच्या प्रक्रियेचा एक भाग व आजवरच्या भांडवली विकासप्रक्रियेचा परिणाम म्हणून वंचित घटकांच्या संख्येत वाढ होत आहे. हे वंचित घटक संघटित राजकारणाच्या परिघाबाहेरचे आहेत. त्यात दलित-शोषितांची संख्या जास्त आहे. त्यांचे संघटन होणे ही गोष्ट फारच जिकिरीची आहे. राजकीय प्रक्रियेत त्यांच्या संख्येचा वापर होतो पण त्यांचे 'राजकारण' होत नाही. त्यांच्या चळवळीही दीर्घजीवी न होता अल्पकालीन ठरतात. आजघडीला वंचितांची ही संख्या मोठी असूनही वंचितांच्या चळवळी प्रभावक्षम होत नाहीत असे का घडते याची व वंचितांच्या चळवळींच्या यशापयशाची मीमांसा डॉ० राजेश्वरी देशपांडे यांच्या दीर्घ निबंधात आली आहे. डॉ० देशपांडे यांचा हा निबंध वंचितांच्या चळवळींसाठी उपाययोजनेबाबत दिशादर्शक ठरावा.

जागतिकीकरणाचा एक मोठा परिणाम कामगार चळवळींवर झाला आहे. एकेकाळी क्रांतीचा 'नायक' मानला गेलेला हा घटक व त्याची चळवळ आज विलक्षण पेचात सापडली आहे. केवळ कामगारांचे वर्गीय संघटन करून जागतिकीकरणाचा मुकाबला करता येणार नाही हे तर खरेच, पण नव्या तंत्रज्ञानामुळे कामगार संघटनांचा भौतिक पायाही विस्कटला आहे. एका ठिकाणी, एका छताखाली हजारो कामगार हे एकेकाळचे वास्तव उत्पादनक्षेत्रातील रचना व बदलांमुळे आता दृश्यमान होत नाही. त्यामुळे कामगारांचे संघटन करणे कठीण होत आहे, असलेले संघटन प्रभावी करणे/होणे यालाही मर्यादा येताहेत व जागतिकीकरण तर थांबवता येत नाही, या पेचात कामगार चळवळ अडकली आहे. त्यातच संघटीत कामगार विभागांपैकी एक मोठा विभाग दृष्टिकोन व हितसंबंध यांच्या आधारे जागतिकीकरणाच्या प्रक्रियेला पाठिंबा देताना आढळतो. कारण हा गट आता उच्च मध्यमवर्गाचा घटक बनला आहे. अशा वेळी कामगार चळवळ चालवताना जी आव्हाने आहेत, त्यांची दखल घेत, काही ठोस उपाय श्री० राजीव साने यांनी आपल्या प्रदीर्घ निबंधात सुचवले आहेत. श्री० साने यांच्या निबंधात शोषण संकल्पना, शोषण पातळ्या यांबद्दलचा तुलनेने नवा दृष्टिकोन आढळेल. कामगार चळवळीतील कार्याचा दीर्घ अनुभव श्री० साने यांना असल्याने त्यांचा निबंध अधिक सूक्ष्मतर पातळीवरील प्रश्नांचीही चर्चा करतो. कामगार चळवळींच्या नेत्यांसाठी, कार्यकर्त्यांसाठी हा निबंध फारच मोलाचा ठरावा. केवळ जागतिकीकरणावरच नव्हे तर एकूण आजवरच्या विकास-प्रक्रियेवर पर्यायी विकासनीतीने मोठेच प्रश्नचिन्ह उभे केले आहे. पर्यायी विकासाची चर्चा १९८० च्या दशकात सुरु झाली व त्यावर आधारित लढे, जनचळवळी, आंदोलने देशाच्या विविध भागांत अस्तित्वात आली. याचवेळी शासनाबाहेर पण विकासप्रक्रियेतील कुठल्यातरी प्रश्नांच्या आधारे लोकांमध्ये काम करणाऱ्या स्वयंसेवी संस्थांचाही उदय झाला. स्वाभाविकच या संस्था, त्यांचे निधिस्रोत, भूमिका व राजकारण हाही आज चर्चेचा विषय आहे. आर्थिक विकासाच्या प्रक्रियेत जनसंघटनांची भूमिका काय असेल/असावी, हा महत्त्वाचा प्रश्न श्रीमती मेधा पाटकर यांनी आपल्या निबंधात हाताळला आहे.

जागतिकीकरणाच्या राजकीय-आर्थिक बाजूंची चर्चा आपल्याकडे सातत्याने चालू असते पण संस्कृतीच्या क्षेत्रातही राजकारण मोठ्या प्रमाणावर चालू आहे, त्याची चर्चा फारशी होत नाही. जागतिकीकरणाला जी सांस्कृतिक बाजू आहे, जिचा परिणाम इथल्या सांस्कृतिकतेवर होतो. काहीजण त्याला जागतिकीकरणाचे सांस्कृतिक आक्रमण असेही म्हणतात. ते आक्रमण असेल तर त्याचा प्रतिवाद कसा करावयाचा हा प्रश्न साहजिकच कळीचा ठरतो. या प्रश्नाची चर्चा डॉ० वीणा आलासे यांच्या निबंधात आली आहे. गांधी, टागोर व आंबेडकर यांच्या विचारांच्या परिप्रेक्ष्यातून ही चर्चा डॉ० वीणा आलासे यांच्या निबंधात आल्याने त्यांच्या निबंधात

अनुक्रमणिका

इथल्या सांस्कृतिकतेचेही भान व्यक्त होते. संस्कृती व तिचे राजकारण यांची समाजशास्त्रीय अंगाने चिकित्सा प्रा० पुष्पा भावे यांच्या निबंधात आली आहे. संस्कृतीविचारांच्या चर्चाविश्वात हा निबंध खरोखरीच मोलाची भर घालणारा आहे. जागतिकीकरणाच्या तडाख्यातून शिक्षणक्षेत्रही सुटलेले नाही. एका बाजूला प्रस्थापितांच्या राजकीय इच्छाशक्तीचा अभाव तर दुसऱ्या बाजूला जागतिकीकरणाचा झंझावात यामुळे गरीब दलित अशा वंचित घटकांपुढे शिक्षणाबाबत मोठीच आव्हाने निर्माण झाली आहेत. शिक्षणक्षेत्रातील तथाकथित स्पर्धात्मकता, त्यातून राज्यसंस्थेची या क्षेत्रातून हळूहळू पडलेली माघारीची पावले याने वंचित समाजगटांचे शिक्षण व भवितव्य कात्रीत सापडले आहे. आजच्या शैक्षणिक अर्थकारणातून व भेदभावातून आधीच अस्तित्वात असलेली विषम संधी व आर्थिक-सामाजिक विषमता या आणखीनच ठळक होत आहेत. या शैक्षणिक वास्तवाची दखल व मीमांसा श्री० अरविंद वैद्य व श्रीमती रेखा ठाकूर यांच्या निबंधात तपशील/आकडेवारीसह आली आहे.

या संग्रहातील साऱ्याच निबंधांमधून विसाव्या शतकाअखेरच्या वास्तवाचे निर्देशन होते. स्वातंत्र्योत्तर काळापासून स्वीकारलेल्या चुकीच्या विकासप्रक्रियेतून, घोषित उद्दिष्टांच्या सदोष अंमलबजावणीपासून, तडजोडींच्या राज-कारणातून, धनिकधार्जिण्या सत्ताधारी गटांच्या वर्चस्ववादी धोरणातून, शासनाच्या इच्छाशक्तीच्या अभावातून जे प्रश्न निर्माण झाले होते, ते प्रश्न जागतिकीकरणाच्या आगमनाने वेगाने जास्तच भयंकर स्वरुप धारण करतानाचे एक वास्तव विसाव्या शतकाअखेर भारतीयांसाठी शिल्लक आहे. पण याहीपेक्षा भयानक गोष्ट म्हणजे आजवरच्या सर्व धोरणांची दिशा जागतिकीकरणाने विपरित केली आहे व न्याय, समता यांसारख्या उद्दिष्टांचे विरूपीकरण केले आहे. भारतीय समाजासमोरील प्रश्नांचे अग्रक्रम बदलले आहेत. याचा परिणाम भारतातील स्त्रिया, दलित-गरीब, आदिवासी-भटके यांसारख्या सर्वच वंचित समूहांना भोगावा लागत आहे. या समूहांचे सीमांतीकरण व त्यातून उद्‌भवणाऱ्या समस्या वेळीच रोखल्या जाऊन न्याय व समतेच्या अधिष्ठानावर या समूहांच्या प्रश्नांची दखल घेतली गेली नाही तर समताधिष्ठीत समाजाचे, भारतीय संविधानाने आश्वासित केलेले स्वप्न कधीच साकार होणार नाही. भारतीय राष्ट्र-राज्याला 'आतून' असलेले हे आव्हान, जागतिकीकरणाने अधिकच तीव्र केले आहे व हीच विसाव्या शतकाची भारतासाठीची फलश्रुती म्हणावी लागेल.

४

विचारवेध संमेलनांनी काय साध्य होते, असा प्रश्न अधूनमधून उपस्थित केला जातो. एका दृष्टीने पाहता प्रस्तुत निबंधसंग्रह हे या प्रश्नाला मिळालेले ठोस उत्तर म्हणता येईल. विचारवेध संमेलने ही कृतिवेध संमेलने नसल्यामुळे त्यात एखाद्या चळवळीचा कृतिकार्यक्रम निश्चित व्हावा अशी मुळातच अपेक्षा नाही. विचारवेध संमेलनाचे ते उद्दिष्टही नव्हते. आपल्याला सामोरे जावे लागत असलेल्या व आपल्या जिव्हाळ्याच्या प्रश्नांचे यथार्थ आकलन हा विचारवेध संमेलनाचा हेतू होता. त्यानुसार त्या प्रश्नांचे सर्व पैलू समोर यावेत, असा आवर्जून प्रयत्न केला गेला याची साक्ष या निबंधसंग्रहातील निबंधांत मिळेल.

एकापरीने हा निबंधसंग्रह अतिशय योग्य वेळेला प्रकाशित होत आहे. सध्या मराठी विचारविश्व वैचारिकदृष्ट्या असहिष्णू शक्तींद्वारा नियंत्रित होताना दिसते आहे. देशातील व राज्यातील सांप्रदायिक व फॅसिस्ट शक्ती परंपरा, अस्मिता, इतिहास यांच्या पूर्वगौरवाच्या नावाखाली वैचारिक असहिष्णूतेची हिंसक दहशत बसवत आहेत तर नवभांडवली-जागतिकीकरणवादी शक्ती माणसाला 'विचारी' राहण्यापासून परावृत्त करण्याच्या प्रयत्नात आहेत. भांडवली शक्ती 'विवेकी आणि सर्जनशील' अशा माणसाचे 'अविवेकी, मठ्ठ व भोगलोलुप ग्राहका'त स्वरुपांतर करताहेत. सोवियत रशियाच्या विघटनानंतर विसाव्या शतकाच्या अंताच्या सुमारास नवभांडवली शक्ती आपल्या वर्चस्ववादी व नवसाम्राज्यवादी उद्दिष्टांना घेऊन बेलगाम झाल्या आहेत. नवभांडवशाहीचा वारू चौखूर उधळला असून इतिहासाचा अंत, विचारप्रणालींचा अंत अशा उद्दाम घोषणांचे सिद्धान्तन आज प्रतिष्ठित होताना दिसते आहे. माणसाच्या समग्र 'मानवीपणा'वरचा हा आघात केवळ 'विचारशील माणूसच' थोपवू शकतो. म्हणूनच 'माणूस' असण्याची व 'माणूस' म्हणून जगण्याची धडपड हेच आज एक ताबडतोबीचे वांछनीय राजकीय उद्दिष्ट बनणे गरजेचे झाले आहे.

लोकशाहीचा स्वीकार केलेल्या समाजात त्या दृष्टीनेच निकोप विचारमंथनाची प्रक्रिया सातत्याने सुरु राहणे अत्यंत महत्त्वाचे असते. याच विचारमंथनातून नवनवीन

विचारांचा उदय होऊन तो समाजाला गतिशील ठेवत असतो. विचारांच्या (व कृतींच्याही) क्षेत्रातील अवरुद्धता व साचेबंदपणा सर्वच समाजाला साचलेल्या घाण पाण्याच्या डबक्याची अवकळा आणतो. अशा समाजात मग असहिष्णू शक्तींचेच फावते. आजच्या आपल्या वैचारिक जीवनाची जवळपास हीच स्थिती झाली आहे. एका बाजूला भूतकाळातील जुनाट, कालबाह्य विचारांची मढी तर आम्ही उराशी कवटाळतो आहोतच, पण दुसऱ्या बाजूला आपापली मते अत्यंत अभिनिवेशाने मांडतो आहोत. वैचारिक सहिष्णूतेच्या अभावी वैचारिक जीवनातील संवादाचा मार्गच बंद होताना दिसत आहे. त्यामुळेच न पटणाऱ्या विचारांवर हिंसक हल्ले होताहेत. लोकशाही मूल्यांवर अधिष्ठित समाजजीवन हे अजूनही आपले केवळ उद्दिष्टच आहे, वैशिष्ट्य झालेले नाही. ही परिस्थिती बदलण्यासाठी आणि लोकशाही समाजाच्या संवर्धनासाठी निकोप विचारांचे मंथन ही गोष्ट मूलभूत महत्त्वाची आहे. यातूनच नागरिकांची राजकीय-सामाजिक-आर्थिक इत्यादी बाबींसंबंधीची मते बनत जातात. यासाठीच विचारांचे आदान-प्रदान चालू राहिले पाहिजे व त्याच वेळी ते निकोप व निर्भय असले पाहिजे. या विचारमंथनाच्या प्रक्रियेत सर्वसामान्यांचा क्रियाशील सहभागही असला पाहिजे. विचार करण्याची जबाबदारी फक्त विचारवंतांवर सोपवून आपण त्यापासून अलिप्त राहावयाचे, ही सर्वसामान्यांची उदासीनता आपल्याला परवडणारी नाही. म्हणूनच निकोप व निर्भय विचारमंथनाची आत्यंतिक निकड असलेल्या आजच्या वातावरणात या निबंधसंग्रहाचे प्रकाशन होणे, ही मराठी विचारविश्वातील औचित्यपूर्ण घटना ठरेल, असे आम्हास वाटते.

५

या संग्रहाच्या छपाईची जबाबदारी 'लोकवाङ्मय गृहा'ने नेहमीच्या आपलेपणाने स्वीकारली, याचा आम्हाला विशेष आनंद वाटतो. मुद्रणाच्या दर्जाबद्दल 'लोकवाङ्मय गृह' नेहमीच जागरूक असते. तसेच वेळेच्या व्यवस्थापनेबद्दलही. या दोन्हीचा अनुभव छपाईच्या काळात वारंवार आला. या संग्रहातील निबंधांची मुद्रणप्रत तयार करणे व सूची तयार करणे यासाठी प्रा० नितीन रिंढे यांनी खूपच आपुलकीने सहकार्य केले. मुद्रिते तपासण्याच्या कामी माधवी विचारे (मुंबई), श्रीमती विजया जोशी (सातारा) यांचीही खूप मदत झाली. प्रा० रिंढे, श्रीमती विचारे व श्रीमती जोशी यांचे व सर्व प्रकारच्या सहकार्याबद्दल 'लोकवाङ्मय गृहा'चे श्री० प्रकाश विश्वासराव यांचेही मनःपूर्वक आभार.

या संग्रहातील काही अभ्यासकांचे निबंध यापूर्वी 'समाज प्रबोधन पत्रिका', 'आंदोलने' या नियतकालिकांनी प्रसिद्ध केले होते. दोन्ही नियतकालिकांच्या संपादकांचेही आम्ही आभारी आहोत. अकादमीच्या विनंतीला मान देऊन आजवरच्या विचारवेध संमेलनात आपले मौलिक योगदान देणाऱ्या सर्व अभ्यासकांचेही आम्ही ऋणी आहोत.

अकादमीच्या आजवरच्या प्रकाशनांना जसा उदंड प्रतिसाद मराठी वाचकांनी दिला, तसाच प्रतिसाद याही संग्रहाला मिळेल, असा विश्वास आम्ही बाळगतो.

▣ ▣ ▣

## विचारमंथनासाठी 'नवभारत'च्या हीरक वर्षानिमित्त

१. या ग्रंथातील विचारांची मांडणी झाल्यानंतर त्यावर चर्चेत पुढे आलेले अन्य काही मुद्दे त्यावेळी मांडण्यात आले असल्यास लेखकांनी ते पाठवावेत. ते प्रसिद्ध केले जातील. त्या मुद्द्यांच्या आधारे पुढे चर्चा चालवावयाची असल्यास तशीही व्यवस्था करता येईल.

२. या ग्रंथातील आपल्या लेखावर ज्यांच्याशी अधिक चर्चा व्हावी असे लेखकांना वाटत असेल अशा महाराष्ट्रातील पाच निवडक व्यक्तींची नावे पत्ते व संपर्क दूरध्वनी, E-mail कळवावेत. त्यांच्याशी संपर्क साधून परस्पर चर्चेची पद्धत ठरविता येईल. ही चर्चाही प्रसिद्ध केली जाऊ शकेल.

३. या साठीची मुदत २००७ मधील 'विचारवेध' संमेलनापर्यंत राहील.

४. या संयोजनासाठी कोणी काही मदत करीत असल्यास तिचे स्वागतच आहे. परंतु तसे साहाय्य मिळाले नाही तरी हे संयोजन पूर्ण होईलच.

- देवदत्त दाभोलकर









## त्रिविध-रूपा

आणि देवदूताने विचारले तेव्हा ती म्हणाली -
'मी सहधर्मचारिणी आहे.
'घरातील सारी कामे मी करते. सारे कष्ट मी काढते.
रात्रंदिवस सारखी राबत असते. मला विसावा नाही.
हे माझे राकट हात पहा...'
आणि देवदूत म्हणाला, 'आई, तू तर एक गुलाम,
मोलकरीण आहेस.'

देवदूताला ती म्हणाली -
'मी गृहलक्ष्मी गृहस्वामिनी आहे.
'मी इकडची काडी तिकडे करीत नाही. सारी कामे चाकरनोकर
करतात. माझी मृदुल त्वचा आणि स्नेहल अंगकांति यांची निगा
राखण्यातच माझा दिवस निघून जातो.'
देवदूत म्हणाला, 'हे वारांगनेचे वैभव आहे.'

ती म्हणाली -
'मी आधुनिक स्त्री आहे.
मी मिळविते.
माझा नवरा मिळवितो.
आमच्या मुलाचे संगोपन दाई करते,
आणि तू रे विचारणारा कोण ?'
देवदूत म्हणाला, 'विकारी दर्पणातील तू
समतेचे विकृत विडंबन आहेस.'

**- देवदत्त दाभोलकर**

१९४८, 'फर्ग्युसन साहित्य सहकार' साठी.
त्यानंतर अर्थातच गंगेतून खूपच पाणी वाहून गेले आहे.

हे मासिक घ.वा. जोशी यांनी अक्षरसाहित्य, ३५, गुरुकृपा सो., शाहूनगर, गोडोली, सातारा ४१५००१ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.




